मि. श्री. **अनंत हरि लिमये**, एम्. ए.

श्री. सौ. **सुलोचना लिमये**, जी. ए.

या दंपतीस स्नेहपूर्वक समर्पित.

## केवळ आभारापुरतें—

हा माझा सहावा कथासंग्रह आहे आणि तो प्रकाशांत आणण्याचें श्रेय श्री. केशवराव जोशी यांना आहे.

सुलभ मुद्रणालयाची सुबक छपाई आणि श्री. दलाल यांचें पंचरंगी चित्र यांनीं पुस्तकाचें बहिरंग तरी डोळ्यांत भरण्याजोगें झालें आहे एवढें मी सांगूं शकतों.

या संग्रहांतली 'बालमित्र' ही कथा मुंबई नभोवाणीच्या सौजन्यानें घेतली आहे.

पुणें,<br>
गणेशचतुर्थी<br>
शके १८७५<br>
ता. १२-९-५३

—लेखक

## कथानुक्रम

# भावबळ

"मोठे असले म्हणून काय झालं? आपल्याला खात तर नाहींत ना? कुत्रं तर अंगावर सोडीत नाहींत ना? फार तर सांगतील, 'तुमची मुलगी आम्हांला कर्तव्य नाहीं.' आम्ही म्हणूं, ठीक आहे; नाहीं तर चाललों आम्ही..."

सोनूमामा आपल्याशींच बोलत बेळगांवांतून ठळकवाडीचा रस्ता कापीत होते. आपली तारू रंगानं उजळ आहे, नाकींडोळीं डोळ्यांत भरण्यासारखी आहे, चार बुकं शिकली आहे, कामाधंद्याला 'वाघ' आहे अन् शिवाय करण्यासवरण्यांत सोज्ज्वळ आहे; तेव्हां तिला घाटावरच एखादा छानसा नवरा पाहिला पाहिजे, ही त्यांची अगदीं आंतली इच्छा होती. आपल्या मुलीला कसलाहि चोखंदळ माणूस हसतहसत पत्करील, असा त्यांना आत्म-विश्वास होता. त्यासाठीं ते चार दिवसांपूर्वीं स्थळं शोधण्याच्या मोहिमेवर बेळगांवला आले होते. ओळखीदेखीच्या माणसांकरवीं त्यांनीं चार स्थळांचा अंदाज घेतला होता. कांहीं ठिकाणीं यंदा कर्तव्य नव्हतं, तर कांहीं स्थळं त्यांनाच पसंत पडलीं नव्हतीं.

त्यानंतर एका गृहस्थानं सहज बोलतांबोलतां त्यांना ठळकवाडीच्या साठ्यांचं स्थळ सांगितलं होतं आणि त्याचबरोबर हेंहि सांगितलं होतं, कीं 'तें तुमच्या शक्तीबाहेरचं काम आहे. हजारांचा कसा कमरेला बांधूनच त्यांची पायरी चढावी!' पण त्यामुळें सोनूमामांचा उत्साह खचला नव्हता आणि 'यत्न तो देव जाणावा' म्हणून ते आतां साठ्यांच्या बंगल्याचा तपास करीत एका विशिष्ट दिशेनं चालले होते.

अगदीं कडेच्या एका बंगल्यापुढें ते येऊन थांबले. खाणाखुणा पटल्याशा पाहून त्यांनीं हळूच फाटक उघडलं. ती दुपारच्या चहाची वेळ होती. एक पोक्तसा गृहस्थ नुकतीच वामकुक्षी संपवून पुढच्या पडवींतल्या झोपाळ्यावर

येऊन बसला होता. त्याच्या हातांत होमिओपाथीचं एक लहसं पुस्तक होतं अन् जवळच एका उघडलेल्या पेटींत खणाखणांतून सारख्या आकाराच्या कांहीं बाटल्या उभ्या होत्या. त्याच्या एकंदर रुबाबावरून सोनूमामांनीं ताडलं कीं, ' हाच मुलाचा बाप ! '

" कुठून आलांत ? " या साठ्यांच्या प्रश्नावर सोनूमामांनीं नामगोत्र उच्चारून मुख्य मुद्दयालाच हात घातला. साठ्यांनीं आपल्या घाऱ्या डोळ्यांनीं त्यांना एकदां आपादमस्तक न्याहाळून घेतलं. ' अस्सं ' म्हणून त्यांनीं हातांतलं पुस्तक खूण घालून बाजूला ठेवलं. काय सांगावं आणि कसं सांगावं तें मनांत निश्चित होईपर्यंत पेटींतल्या औषधाची एकेक बाटली उचलून कालीफास, आर्सेनिकम्, पल्सेटिला अशीं वरचीं अक्षरं पुटपुटत ती पुन्हा त्या त्या खणांत ठेवण्याचा चाळा केला.

सोनूमामाहि कांहीं कच्च्या गुरूचे चेले नव्हते. त्यांनींहि तेवढ्या अवधींत बसल्या जागेवरून दिसेल तेवढा बंगल्याचा आसमंत निरखून घेतला. गोठ्यांतल्या म्हशीची खडबडहि त्यांना ऐकूं आली. स्वतःचं घर अन् गोठ्यांत दुभतं जनावर, एवढं असलं कीं, कोकणांतला माणूस खूष झालाच म्हणून समजावं. सोनूमामा तसे झाले. त्यांनीं तें स्थळ आपल्या तारूला एकदम पसंत केलं. आतां उत्तर काय मिळतं तें ऐकण्यासाठीं त्यांचा जीव खालवर होऊं लागला.

" तुम्ही आलांत खरं; पण आमचं जवळजवळ ठरल्यासारखं झालं आहे. येत्या शनिवारीं सांगलीचे एक गृहस्थ मुलगी दाखवायला आणणार आहेत. तिचा फोटो आम्हांला पसंत पडला आहे. मुलगी मॅट्रिक झालेली आहे. बाप चांगला ' आस्तिक ' आहे. हात सढळ सोडायला तयार आहे. आणखी काय हवं ?..."

" हें सगळं खरं; पण अजून शब्द नाहीं ना गेला ? "

" शब्द नसला तरी कल तिकडे गेला आहे. "

" माझी मुलगी एकदां पाहिलीत तर तो वळेल असं मला वाटतं. " सोनूमामा न कचरतां बोलले.

साठ्यांनीं पुन्हां एकदां त्यांच्याकडे रोखून पाहिलं नि गृहिणीला हाक

मारून म्हटलं, "अहो, तो फोटो आणा बरं इकडे!" त्यांच्या आदेशानुसार फोटो झोपाळ्यावर येऊन पडला.

"पहा हा फोटो एकदा. हिच्याहून तुमची मुलगी सरस आहे?"

सोनूमामांनीं त्यांचा अपमान होऊं नये, म्हणून ती उपवर वधूची छबी हातांत घेऊन न्याहाळली आणि ती परत खालीं ठेवतांठेवतां म्हटलं, "ही मुलगी मी वाईट म्हणत नाहीं. पण मी एवढं निश्चयानं सांगतों कीं, माझी मुलगी न पाहतां तुम्हीं जर दुसऱ्याला शब्द दिलांत तर एक चांगली मुलगी हातची दवडलीत असं होईल. रावसाहेब, मीं दहा मिनिटांत शक्य तेवढं आपलं घरदार न्याहाळून घेतलं आहे. चेहऱ्यावरून मी जी माणसांच्या शीला-स्वभावाची पारख करूं शकतों त्यावरून तुम्हां दोघांविषयीं मीं कांहीं अटकळ बांधली आहे. हें कामसू, निरलस माणसांचं घर आहे. इथं येणारी मुलगी कशी अष्टावधानी, चुणचुणीत हवी. उठवळ मुलगी या घरांत कामाची नाहीं. जिचे हातपाय सारखे फिरत राहतील, जी चंदनासारखी हसतहसत झिजेल, जी वडील माणसांना तुच्छ न लेखतां त्यांच्याकडून रीतभात समजून घेऊन कुलपरंपरा चालवील नि जी वृद्धपणीं तुम्हां दोघांची सेवाचाकरी करतांना सुनेची मुलगी होईल अशी सून या घराला पाहिजे. माझी मुलगी या कसोटीला उतरेल अन् तुम्हांला कधींहि पश्चात्तापाची वेळ येऊं देणार नाहीं, असा मी निर्वाळा देतों."

सोनूमामांच्या या वक्तृत्वानं साठे एकदम थक्कच झाले. मुलगी सांगायला आलेला गृहस्थ एवढा धीट असलेला त्यांनीं पाहिला नव्हता. सोनूमामांच्या बोलण्यांतली खुमासदार प्रशंसा ऐकून ते थोडे खुलले. त्यांना वाटलं, कीं इतकी चांगली मुलगी असेल तर, तिला पाहिल्याशिवाय दुसऱ्याला शब्द देणं बरं नव्हे. तीस वर्षं नोकरींत काढून पंचावन्नाव्या वर्षी पेन्शन घेतलेला तो व्यवहारांतला मुरब्बी गृहस्थ खरं म्हणजे त्या सांगलीकर मुलीच्या फोटोला विशेषसा भाळला नव्हता. तो खरा भाळला होता तो सांगलीकरांच्या कनकाला! हा कोंकणांतला जमीनदार गृहस्थ मुलगी देऊन आपली सोन्याचीहि तहान बऱ्यापैकीं भागवीत असेल, तर याचा शब्द मानायला कांहीं हरकत नाहीं, एवढ्या निर्णयावर थोड्याच वेळांत तो आला.

“ हें पहा, आतां तुम्हांला सांगतों. येत्या शनिवारीं दुपारपर्यंत तुम्ही तुमची मुलगी आणून दाखवा. सांगलीकर त्या दिवशीं संध्याकाळीं येणार आहेत. त्या दिवशीं दुपारीं बारा वाजेपर्यंत माझं फाटक तुम्हांला मोकळं आहे. ती वेळ टळली कीं, तुम्ही-आम्ही कुणी नव्हे ! ”

“ अवश्य ! ” म्हणून सोनूमामा तिथून उठले. लगेच गाडी पकडून ते घरीं आले. तारूला घेऊन योग्य वेळीं पुन्हा कुळ्यांला आले. पण गाडीला अतोनात गर्दी असल्यामुळं त्यांना तिकीट मिळालं नाहीं. तें दुसऱ्या दिवशीं मिळालं. त्या गाडीला विलंब होऊन लोंढ्याहून पुढची गाडी हुकली ! शनिवारीं सकाळीं बेळगांवांत येणारे सोनूमामा रविवारीं सकाळीं पोंचले. आतां साठ्यांच्या स्थळाची आशा त्यांना नव्हतीच. पण आल्यासारखं तिथवर जाऊन घडलेला वृत्तान्त सांगावा आणि आपण अविश्वासू नाहीं एवढी त्या मंडळींची खातरजमा करून परत यावं, या अपेक्षेनं ते सरळ साठ्यांच्या बंगल्यावर गेले. त्या वेळीं सकाळचा नवांचा सुमार होता. साठीणबाई त्यांच्या स्वागतासाठीं पुढं आल्या. सोनूमामा झोपाळ्यावर बसले. तारा माजघरांत गेली. सोनूमामांनीं विचारलं, ‘ रावसाहेब घरीं नाहींत वाटतं ? ’

“ सांगलीकर मंडळींच्याबरोबर गांवांत जाणं झालं आहे. ”

“ अस्सं ! ते कालच आले असतील. तुमचं ठरलंच असेल मग– ”

“ हो. काल रात्रींच ठरलं. ”

सोनूमामांच्या चर्येवर निराशा चक्क दिसून पडली. आपल्या प्रवासाचे कसे तीनतेरा झाले तें ते साठीणबाईंना सांगूं लागले. पण त्यांच्याशीं प्रश्नोत्तरं करीत बसायच्याऐवजीं साठीणबाई माजघरांत जाऊन त्या अपरिचित मुलीची वास्तपुस्त करूं लागल्या. जरा वेळ थांबून सोनूमामा उठले अन् दाराशीं येऊन म्हणाले, ‘ बरं आहे. येतों आम्ही आतां. ’

साठीणबाई जरा संभ्रांत झालेल्या दिसल्या. चटकन् त्यांना निरोपाचा शब्द उच्चारवला नाहीं. त्यांनीं तारूकडे एकदा अन् सोनूमामाकडे एकदा असं आळीपाळीनं पाहिलं. त्यांना कुठं तरी कांहीं तरी खटकत होतं. बोलावं, न बोलावं अशा संदेहवृत्तींत क्षणभर घोटाळून अखेर त्या म्हणाल्या,

" तुम्ही रात्रभर गाडीच्या प्रवासांत दमून आलां आहांत. खरं म्हणजे मीं तुम्हांला ' जेवून जा ' असं सांगायचं. पण काय करूं ? आज माझा घरांत हात लागत नाहीं. तुमची परवानगी असेल तर मी मुलीलाच तुमच्यासाठीं चहा करायला सांगणार आहें. "

" हात्तेच्या ! त्याला कशाला परवानगी हवी ? पण चहा हवाच आहे असं नाहीं. "

" तें खरं; पण गृहस्थधर्माला तें बरं नाहीं दिसत. "

" मग अवश्य करा. तारू, ऊठ बायो ! "

थोड्या वेळानं चहाच नव्हे; तर त्याबरोबर एक लाडूहि सोनूमामांच्या पुढं आला. त्यांना आज लाडवाची गोडी नव्हती तरीहि साठीणबाईंचं आतिथ्य त्यांना गोड वाटलं. ते चहा घेत असतांना साठीणबाई आंत तारूला कांहीं सांगत होत्या तिकडे त्यांचे कान लागले.

"...आज आणीबाणीची वेळ आहे. परकी मंडळी घरांत नि मी बाहेरची. दुपारीं त्यांच्या पानांत अन्न कसं पडेल या विवंचनेंत मी आहें. गांवापासून आमचं घर पडलं लांब. तेव्हा कुणीहि सैंपाकाची बाई इकडे यायला तयार होत नाहीं. पण गड्याला पाठवून कुणाला तरी बोलावून आणणंच भाग आहे आतां. "

सोनूमामा तें ऐकून पुन्हा दाराशीं गेले अन् म्हणाले, " हें पहा, आमचं कांहीं आत्तांच जायचं नडलेलं नाहीं. कुठं तरी आम्हांला जेवायला हें हवंच. तेव्हां दुसरीकडे जायचं तें इथंच राहूं. तारू रांधील अन् तुम्हांला वाढून आपणहि जेवील. "

कल्पना अभिनव होती; सोयीचीहि होती. पण साठीणबाई ती पत्करायला तयार होईनात. त्या म्हणाल्या, ' तसं नको. तिला बिचारीला कशाला त्रास... '

" अहो, सैंपाक करायला त्रास मानील तिनं मुलीचा जन्म घ्यावाच कशाला ? तुम्ही संकोच नका करूं. बघा तर खरं, तिला कसं काय जमतं तें. आलं तुमच्या पसंतीला तर तुमच्या नात्यागोत्यांत एखादं स्थळ बघा तिच्यासाठीं. "

सोनूमामा बोलतांबोलतां हसले. साठीणबाईहि हंसल्या. येईल तो प्रसंग आपलं कार्य साधण्याच्या दृष्टीनं राबवून घ्यायचा यांत सोनूमामा तरबेज होते. साठीणबाईंनीं त्यांचं म्हणणं मान्य केलं. मनांतून त्यांना 'देव पावला' असंच वाटलं. तारा त्यांच्या मार्गदर्शनाखालीं कामाला उभी झाली. न्हाणीघरांत तिच्यासाठीं पाणी तापलेलं होतंच.

एवढ्यांत साठे आणि त्यांचे भावी व्याही सांगलीकर हे दोघे घरीं परतले. सांगलीकरांच्या हातांत चांदीच्या मुठीची काठी होती ती ते टेकीत टेकीत येत होते त्या काठीला स्वतःचं वजन तर होतंच; शिवाय आणखी धन्याच्या पैशाचंहि बळ होतं. साठ्यांना त्या बळाची पूर्ण जाणीव झाली होती आणि ते आपली वरपक्षाची ऐट जरा सौम्य करून त्यांच्या सरबराईत लक्ष घालीत होते. त्यांनीं सेवानिवृत्तींतला व्यवसाय म्हणून होमिओपाथीची वैद्यकी सुरू केली होती. पण आज त्यांना आपल्या रुग्णांची वास्तपुस्त करायला सवड नव्हती.

ते घरीं येतात तों सोनूमामा झोपाळ्यावर बसलेले. त्यांना पाहून साठ्यांच्या कपाळाला आठी पडली. आज त्यांना त्यांची प्रतिष्ठा नव्हती. एक तर ते मुदतीबाहेर गेले होते आणि दुसरं म्हणजे सांगलीकरांची गाय त्यांच्या कल्पनेपलीकडे दुधाळ होती. अन् अधिक आगळी पिळली तरी चालण्यासारखं होतं. सोनूमामांनीं उठून नमस्कार केला तेव्हां त्यांनीं आपले हात उगाच जेमतेम उचलले.

" तुमची मुदत टळून गेली. "

" खरं आहे, रावसाहेब ! "

" मग ? "

" मग काय ? दर्यात तारूं लोटलेलं आहे. कुठं लागेल तिथं लागेल... "

आंत गेल्यावर साठ्यांना घरांतली अडचण कळली. त्यावर तोड काय निघाली आहे तेंहि समजलं. सांगलीकर मंडळी संध्याकाळच्या मेलनं परत जाणार होती. तेव्हां दुपारचा प्रश्न कसा तरी सुटतो आहे हें पाहून ते पत्नीला म्हणाले, ' ठीक. '

सांगलीकरांची मुलगी अन् साठ्यांचा मुलगा हीं दोघंहि पाठोपाठ घरांत शिरलीं. त्याला आज रविवारची सुट्टी असल्यामुळें तो मोकळा होता अन् ती सदाचीच 'मोकळी'. जयंताला लीला पसंत झाली होती; लीलेला जयंत प्रिय वाटला होता. त्यांच्या आई-बापांनीं दोघांचं शुभमंगल ठरवून टाकलं होतं. आणि पुढं बोहल्यावर निर्माण होणारं नातं आतांपासूनच सुरू झालं अशा भावनेनं तीं दोघं—विशेषतः ती वागूं लागली होती. या एका दिवसाच्या सहवासांत ती जयंताला पुरता जिंकून 'पुनरागमनाय च' जाणार होती. प्रियकराला जिंकायला लागणारीं सगळीं शस्त्रास्त्रं तिच्यापाशीं सहजसिद्ध होतीं. श्रीमंत बापाची लाडकी लेक. त्यांतून सुशिक्षित. कॉलेजच्या पहिल्या वर्षांत ज्ञानामृताचा रतीब घेणारी. त्यामुळं बोलण्याचालण्यांत पुरोगामी व्हायला तिला रान मोकळं होतं.

"आपल्याला फक्कडसा चहा हवा बुवा. नाहीं का हो, आप्पासाहेब?" तिनं बापाकडे पाहून, पण साठीणबाईंना उद्देशून आपली तलफ व्यक्त केली. घरांत निर्माण झालेली नवी अडचण तिला ठाऊक नव्हती. साठीणबाईंनीं ती तिला सांगितली. 'आतां कसं हो!' म्हणून लीलेनं सभय मुद्रा दर्शविली. 'ती मुलगी आली आहे ती करील सगळं.' असं जयंताच्या आईनं सांगतांच तिचा 'ऊर्ध्व' खालीं पडला. तिचं कुतूहल साहजिकच जागृत झालं. नवी आलेली मुलगी कोण, कुठली, कशाला, या गोष्टींची तिनं चौकशी केली. 'जयंतासाठीं दाखवायला आणली होती' या उत्तरावर तिनं 'अय्याऽऽ' म्हणून डोळे ताणले. ती सहज म्हणून; पण मनांतून तिला पाहण्यासाठीं न्हाणीघराकडे डोकावून आली. मग तिच्या मनांत ज्या कांहीं कल्पना स्फुरल्या त्या तिला आवरणं मुष्कील झालं. जयंताजवळ त्यांचा उच्छ्वास घालवल्याशिवाय आणि त्याची जरा थट्टा केल्याशिवाय तिला स्वस्थ होतां येईना. आपल्या निनॉनच्या साडीचा घोळ दोन्ही हातांच्या चिमट्यांत पकडून ती जिना चढून माडीवर गेली. जयंत तिथं दाढीचं सामान काढून साबणावर ब्रश फिरवीत होता.

"बाई, बाईऽ! मोठ्या आपत्तींतून सुटलें."

तिनं सुटकेचा अभिनय फारच सुंदर केला आणि जयंताला तो पहात

रहावासा वाटला. आपल्या प्रियेवर कोणता एवढा गहजब गुदरला तें विचारायचंसुद्धां तो विसरला. लीलाच पुढं बोलूं लागली.

" तुमच्या आई बाहेरच्या बसल्या आहेत. मला वाटलं, कीं आतां आपल्याला चुलींत पडावं लागणार. नको रे बाबा ते हाल! पण देवानं माझं संकट ओळखून आयत्या वेळीं एक सैंपाकीण पाठवून दिली. "

ती आपल्या विनोदावर खूप हसली. तिच्या कानांतल्या लांब दाल्यांच्या कर्णभूषणांनीं डोलून डोलून आपल्या धनिणीच्या विनोदाला संमति दिली. तिचा शेपटासुद्धां डाव्या खांद्यावरून झट्‌कन पुढं आला अन् तितक्याच वेगानं पुन्हां मागं जाऊन नितंबावर रुळला. असल्या क्रीडा म्हणजे तिचं लाघव होतं.

" कुठून आली ही सैंपाकीण ? " जयंतानं पृच्छा केली.

" आली होती तुमची अर्धांगी व्हायला; पण ती जागा कालच भरली. मग काय करील ? म्हणाली, कीं आजच्या दिवस सैंपाकीण तरी होऊंया या घरची...विहिरीकडे नजर टाका म्हणजे दिसेल तुम्हांला. "

जयंतानं खिडकीवाटें नजर बाहेर फेकली. त्याला विहिरीच्या रहाटावर खालीं-वर होणारे दोन हात तेवढे बसल्या जागेवरून दिसले. नाजूक, लांब बोटांचे, गोरे अन् नितळ. त्या करसौंदर्याचं सामर्थ्य विलक्षण होतं. जयंत चटकन् उठून खिडकींत उभा झाला. लीलाहि त्याच्या शेजारीं आली. तारा अंग धुऊन विहिरीची कळशी काढीत होती. तिनं ओलेतं लावून घेतलं होतं तें तिच्या अंगाला चिकटून बसलं होतं अन् गुडघ्यापर्यंतच पुरलं होतं. पाणी ओढतांना प्रत्येक हिसक्याला ती कमरेंत वाकत होती अन् लगेच किंचित् सरळ होत होती. प्रत्येक वेळीं तिचे अवयव जागच्या जागीं हालत होते अन् पुन्हा स्थिर होत होते. तिच्या पाठीच्या कण्याची पन्हळ बरीचशी उघडी दिसत होती अन् विधाता ती कोरून नुकताच बाजूला झाला आहे कीं काय, इतका तजेला तिथं दिसत होता.

त्या वनहरिणीला आपली कुठून तरी पारध होत असेल याची मुळींच कल्पना नव्हती. तिनं घागर वर घेतली. तिच्या गळ्याचा फांस काढला. तिच्यांतलंच चुळकाभर पाणी ओतून आपले आरक्त तळवे धुतले. ती उचलून

डाव्या कडेवर घेतली. त्याच वेळीं तिची नजर वर झाली. तिचे डोळे माडींतल्या चार डोळ्यांना एकवार ओझरते भिडले अन् कमळं मिटावीं तसे एकदम संकोचून खालीं आले. ती लाजली, किंचित् घाबरली अन् हृदयांत सूक्ष्म कंप अनुभवीत घरांत आली.

" झालं पाहून ? समाधि लागली होती जशी कांहीं ! पुरुषांना लाज नसते म्हणतात तें खोटं नव्हे ! " लीलेनं जयंताला डिवचलं. तो एकदम भानावर आला.

" हिला तूं सैंपाकीण म्हणतेस, लीला ? "

" मग काय म्हणूं दुसरं ?—तेंहि म्हटलं असतं; पण त्याला आतां कायद्यानं बंदी आहे. ऋद्धि-सिद्धि अन् मधें गणपति हें दृश्य आतां बेकायदा आहे म्हटलं ! "

" कायदा गाढव आहे. "

" असेल; पण मी नाहीं ना ? मला नाहीं असलं खपायचं. "

अन् मग त्यावर दोघंहि हंसलीं. थोड्या वेळानं खालून आईची हांक आली. ' जयंता, चहा घ्यायला चला रे ! ' या हाकेंत सूक्ष्मशी रुष्टतेची झाक होती. जयंताची आई मनांत म्हणत होती, ' हे पैशाला भुलले आहेत. जयंता तिच्या नखऱ्यांना भुलला आहे. पण या नाचऱ्या बयेला वागवून घेतांना कर्म ओढवणार आहे माझं ! '

तीं दोघं खालीं आलीं. तारूनं त्या दोघांच्या पुढें दोन कप ठेवले. या वेळीं ती झुळझुळीत नऊवारी साडी आटपसर नेसून अन् कोपरापर्यंत पोचणारी धारवाडी खणाची चोळी घालून पुढं आली होती. तिची ही वेषभूषा अगदीं जुन्या पद्धतीची हें खरं; पण दुर्मिळपणामुळं जयंताच्या दृष्टीला तीच अभिनव वाटली. पेहेरणाराच्या अंगांत चैतन्य मुसावत असलं कीं कसलाहि वेष ' सुवेष 'च होतो, हें कालिदासाचं मत पुन्हां एकदां त्यानं अनुवादलं.

लीलेच्या कानांत सदा डोलतीं कर्णभूषणं होतीं अन् तारेचे कान ओके होते; पण तरीहि जयंताला ते चांगले दिसले. तिच्या केशबंधांत सामील न झालेल्या दोन आंखूड बटा कानाजवळून खालीं येऊन कानामागं वळल्या होत्या. गोऱ्या तांबूस गालांवरून कानांना शोभवणारा हा तिचा स्वाभाविक

अलंकार जयंताला नितान्त मनोहर वाटला. त्याचं मन नकळत दोघींतलं साम्यवैषम्य पाहूं लागलं.

—लीला सौंदर्यांत देवांगना नाहीं; पण नीटस आहे. तिच्या नाकाचा शेंडा अन् डोळ्यांतल्या बाहुल्या तरतरीत आहेत. तिचं चालणं-बोलणं कसं लाघवी, मोहक आहे! प्रत्येक अंगविक्षेप कसा कलाचतुर! लीला म्हणजे आकाराला आलेली विद्युत्. तिला आपल्या स्त्रीत्वाची जाणीव आहे; पण ती दुबळेपणाची नसून ज्याच्यावर कटाक्ष टाकील त्याला विंधीन, जिंकीन, अशा आत्मप्रत्ययाची. तिच्या सौंदर्याला उचित प्रसाधनाची जोड आहे अन् चातुर्याचा परिवेष आहे. तिच्या संगतींत यौवनाचं सार्थक वाटतं. लीलेनं मला आजच जिंकलं आहे. पण ती कधीं तरी ‘ जिता ’ होईल का?

—आणि ही नवी मुलगी! ही किती टवटवीत आहे! सकाळीं दवांत न्हालेली गुलाबकळीच जशी! ही चालते; पण पाऊल वाजूं देत नाहीं. कासवीसारखे आपले सगळे अवयव विनयाच्या अवगुंठनांत लपवून ही फिरते असं वाटतं. हिचा शब्द ऐकायची मला उत्सुकता आहे; पण ती माझ्यादेखत बोलेल असं वाटत नाहीं. आज आली आहे म्हणूनच नव्हे; तर नव्याची जुनी झाली तरी ही जिवाचा संकोच करूनच वागेल! ही सदाची उग्रमलेली कळीच राहील. आपल्या पाकळीपाकळीचा पूर्ण विकास ही कधींच दाखवायची नाहीं असं वाटतं हिला पाहिलं म्हणजे. हिची ओठांची ठेवण, हिचे डोळे, हिच्या पापण्या, रुंद कपाळावरून मागं वळलेले केस—यां सगळ्या गोष्टी एकच एक भाव व्यक्त करतात अन् तो म्हणजे शरणता. ही वाणीचं साह्य न घेतां आपल्या जिवलगाला सांगेल, ‘ मी तुमची आहें. मला आसरा द्या. तुमच्यावेगळं मला जीवन नाहीं. मी अबोल असेन, तर मला बोलकी करा. वेडी असेन तर शहाणी करा. तुम्ही वळवाल तशी मी वळेन. तुमच्या आत्म्याचा आकार घेईन...’ याच शरणभावनेनं ही नवऱ्याला जिंकील.

तो जिंकला जाईल; पण ती गोष्ट त्याला कळणार नाहीं. लीलेच्या सहवासांत बुद्धीचं सुख आहे, कलेची धुंदी आहे. हिच्या संगतींत आत्म्याचं पोषण आहे, समरसतेचा आनंद आहे....कोणतं चिरंतन? कोणतं बिलोभनीय?...कोणतं अवीट?...या वेळीं तरी निदान मला कळत नाहीं.

लीला स्नान करून आपल्या प्रसाधनाला लागली होती. तारा घरांत भाजी-आमटीला तिखट-मीठ घालीत होती. जयंताची आई दारापाशीं उभी राहून एकेक वस्तु कुठं आहे तें दाखवीत होती. तिनं लीलेला इकडची काडी तिकडे करायला सांगितलं नव्हतं. ती जणुं लीलेचं सत्त्व पहात होती. तिच्या कर्तव्यबुद्धीला स्वयमेव आवाहन मिळतं का पहात होती. जयंताला तें जाणवलं होतं. त्याला वाटलं कीं, 'लीला एवढी पडमूर कशी? आपल्याबरोबरीची एक मुलगी घरांत वावरते तर हिनं नको का जरा तिच्या मदतीला जायला! पाहुणी आली असली म्हणून काय झालं? उद्यां ही घरचीच होणार आहे ना? इतरांनाच नव्हे; तर आपल्यालाहि जेवायला हवं हें कसं हिच्या लक्षांत येऊं नये? आईला काय वाटेल हिच्याबद्दल? उद्यां ही अशीच का वागणार आहे घरांत? मग आफत आहे.'

त्याला तें बरं न वाटून तो घरांत गेला नि आईला म्हणाला, 'मी कांहीं तरी करूं का ग?' त्यावर ती म्हणाली, 'तूं नको कांहीं करायला. ती करील सगळं. तिला आहे उरक तेवढा.' ताराबद्दल आईनं काढलेले हे प्रशंसेचे उद्‌गार त्याच्या अंतर्मनाला गुलाबपाण्यासारखे शीतल अन् सुगंधी वाटले. सहजच तारूची अन् त्याची दृष्टादृष्ट झाली. चटकन् नजर आवरून आपण जणूं पाहिलंच नाहीं असं जें तारूनं भासवलं तें त्याला तिच्या पाहण्याहून अधिक मनोज्ञ वाटलं.

मोठ्या पुरुषांची पंगत प्रथम बसली. जयंत त्यांना हवं नको पाहण्यासाठीं मुद्दाम बसायचा थांबला. तारा ओचा-पदर बांधून वाढीत होती. चापून चोपून नेसल्यामुळें तिच्या सगळ्या अवयवांना साहजिकच उठाव मिळाला होता. ती आंतबाहेर करीत असलेली पाहून जयंताच्या मनांत आलं, कीं अजिंठ्याच्या लेण्यांतली एखादी कोरीव प्रतिमाच सजीव होऊन अन् रंग बदलून आपल्या घरीं वावरायला आली आहे. दाराआड उभी राहून ती जेवणारांच्या पानाकडे लक्ष ठेवीत होती अन् अधूनमधून जयंताच्या हाल-चालीवरहि. जयंत तिला सर्वतोपरी आवडला होता. हा नागर युवक दुसऱ्या एका जिवाचा धनी झाला आहे, त्याच्यावर टकळा ठेवण्यांत सफलता नाहीं हें ठाऊक असूनहि तिचे डोळे तिला दगा देत होते. आपण इथून जाईपर्यंत तो आपल्या दृष्टीपुढं हसता, बोलता रहावा असं तिला वाटत होतं.

ती आपल्या दैवाला मनोमन निखंदीत होती, तरीहि त्याच्या दृष्टिपातानं मोहरत होती.

लीला एकदा-दोनदा माजघरांत डोकावून परत माडीवर गेली. जयंत स्वयंपाकघरांत लुडबूड करतो हें तिला अगदींच असंस्कृत वाटलं. आपण आज संध्याकाळीं जाणार तेव्हां त्यानं शक्य तितकं आपल्या अवतींभवतीं रहावं अशी तिची न्याय्य अपेक्षा होती. प्रहराप्रहरानं बदललेल्या साडी-चोळींतून आपल्या अंगकांतीवर विविध रंगांच्या छटा कशा पसरतात, आपल्या सौंदर्याच्या कळा कोणत्या रंगानं अधिक खुलतात तें त्यानं पहावं, सांगावं, असं तिला वाटत होतं. त्यानं आपलं तोंड भरून कौतुक करावं, अभिलाषेनं अनावर होऊन कांहीं तरी मागावं; मग आपण त्याला कटाक्षांनीं विंधून म्हणावं ' चला ! फार लाडावलांत तुम्ही ! ' असा तिचा मनोदय होता. त्यानं आपल्याला दर्दभरी आवाजांत सांगावं, ' लिलू, मला रोज एक पत्र पाठवायला हवं हं ! ' मग आपण त्याला म्हणावं, ' ये यथा मां प्रपद्यंते... ' ' ज्येष्ठांतल्या पहिल्या मुहूर्तावर लग्न व्हायचं म्हटलं तरी अजून पंधरा दिवस अवकाश आहे. छेः, लिलू, एवढ्या विरहानं मी कालिदासाच्या यक्षासारखा वाळून जाईन ! ' या त्याच्या निःश्वासयुक्त उद्गारांवर आपण त्याला आश्वासन द्यावं, ' कांहीं काळजी करूं नका. मी परत येतांना तुमच्यासाठीं अमृत भरून घेऊन येईन. ' त्यावर ' कुठं भरून आणशील ?– इथं ? ' म्हणून हळूच त्यानं आपल्या अधरावर बोट ठेवावं...

अशा किती तरी रिकामपणांतल्या कल्पना शृंगारतीर्थांत न्हाऊन तिच्या हृदयमंदिरांत प्रवेश करीत होत्या आणि म्हणूनच जयंतानं जवळ असून दूर रहावं हें तिला असह्य झालं होतं. खरं म्हणजे जयंतावर ती रागावली होती. तो तिला अरसिक वाटला होता, प्रणयिनीचा मनोभंग करणारा निष्ठुर वाटला होता. मागची पंगत बसायच्या वेळीं तो जेव्हा तिला खालीं बोलावण्यासाठीं माडीवर गेला, तेव्हा ती त्याला फणकाऱ्यानं म्हणाली, ' आटोपलं का ' खटपट्या 'चं काम ? '

" लिलू, माझ्या घरीं दोन पाहुणे आले आहेत. त्यांत एक तुझे वडील आहेत. मला कांहीं गृहस्थधर्म म्हणून आहे ना ? "

" गृहस्थाला सगळ्यांची काळजी आहे; नाहीं ती आपल्या गृहिणीची.

मला ठाऊक आहे, तुम्हांला त्या कोकणच्या पूतनेभोंवतीं घोटाळायला हवं होतं. ”

“ कालपासून तुला मी शहाणी म्हणत होतों; पण आतां मात्र तूं जातीवर गेलीस. आधीं जेवायला चल. मग तुझा सगळा रुसवा काढतों. संध्याकाळची सगळी वेळ आपलीच आहे. ”

लीला नाखुषीनंच खालीं आली. जयंताच्या आईनं तारूला म्हटलं, ‘ आतां सगळा सैंपाक मधें घे. तुम्हां तिघांचीं पानं वाटोळीं घेऊन एकदम वाढ. माझं या भिंतीशीं ठेव. ’ पण तारूला ती योजना मानवली नाहीं. ती म्हणाली, ‘ मी सगळ्यांना वाढून मग बसेन. ’ त्यावर जयंताची आई पुन्हा म्हणाली, ‘ असं नको. तूं कालपासून उपाशी आहेस. आली भेटी, तिला धरलं वेठी, असं केलं आहे मीं. ’ पण तरीहि तारा पुटपुटली, ‘ नको. मला लाज वाटते. ’

जयंताला वाढायला मिळणार या कल्पनेचं तिला विशेष औत्सुक्य होतं. जयंताबरोबरच या ‘ चमकढवळी ’पुढंहि वांकावं लागणार याबद्दल तिच्या मनांत नाराजी नव्हती असं नाहीं. पण नाराजीपेक्षां खुषीचं पारडं बरंच जड होतं. सहजच तिच्या हातून त्याच्या वरणभातावर चमचाभर तूप अधिक पडलं अन् हें त्याच्या आईच्या तर निदर्शनाला आलं नाहीं ना, या चोरटेपणाच्या कल्पनेनं तिला क्षणभर अस्वस्थ केलं. तिनं सगळा सैंपाक चांगला केला होता; पण तिला पोळ्या चांगल्या साधल्या नव्हत्या. तरीहि त्यांतल्या त्यांत जी हाताला मऊ लागली तीच तिनं जयंताच्या पानांत वाढली.

त्याच्या पानांत पदार्थ वाढतांना तिच्या गोलदार हाताला जो एक सूक्ष्म कंप उठत होता तो जयंताच्या लक्षांत आला होता. त्याबद्दल त्याला तिची काकळूत वाटत होती ! तिचे कोमल हृद्य भाव अस्थानीं निर्माण होत आहेत, ते निराशेच्या धगींत सुकून जायचे आहेत याबद्दल त्याला तिची दया आली होती. तो मनांत म्हणत होता, ‘ तूं एक दिवस आधीं आली असतीस तर– ’ जयंताचं मन तारूकडे थोडं अधिक कलायला मघाशी लीलेनं त्याला दिलेला टोमणा नकळत कारणीभूत झाला होता. जी त्याची जन्माची सखी, सांगातीण होणार होती, ती त्याच्या शेजारच्या पाटावर

जेवायला बसली होती. आणि जी निराश होऊन परत जाणार होती ती त्यानं दोन घांस अधिक खावे म्हणून जिवाची तारांबळ करीत होती.

लीलेच्या पानांत जेव्हां तिनं सबंध पोळी टाकली तेव्हां तिनं वर मान करून तारूवर डोळे रोखले. सगळी पोळी ताटांत वाढणं हा तिला आपल्या नाजूकपणाचा, तसाच आपल्या श्रीमंतीचाहि अपमान वाटला. लीलेच्या केतकी वर्णाच्या मुखावर एकदम तांबारा चढला 'नॉन्सेन्स् !' ती न राहवून उद्‌गारली. भरल्या ताटांतले दोन पदार्थ लोटून द्यायचे, दोन चाखल्यासारखे करायचे अन् कोंबड्यासारखं विचकीत चार घांस खाऊन उठायचं, असं तिचं जेवणाचं श्रीमंती लक्षण होतं.

ती पोळी तिनं हातांत घेऊन चाचपली, पुनश्च पानांत आपटली अन् ती तिच्या जाड कडा कुरतडून पानाबाहेर टाकूं लागली. आपली आई आपल्या भावी सुनेचा हा आचरटपणा पाहून आंत जळते आहे हें जयंतानं पाहिलं. त्यालासुद्धां लीलेचा राग आला. एक श्रीमुखांत वाजवून पानाबाहेर टाकलेले ते तुकडे तिला परत ताटांत घ्यायला लावावे असंहि त्याला वाटलं. तिचा माजोरीपणा आणि त्यामुळं झालेला तारूचा अपमान या दोन्ही गोष्टी त्याला दुखल्या. 'अन्नं ब्रह्म' समजणाऱ्या जयंताच्या आईला तो प्रकार पाहून बोलल्यावांचून राहवलं नाहीं.

"अडचणीच्या वेळीं पानांत पडेल तें गोड मानून घ्यायला हवं माणसानं. 'खाऊन माजावं, टाकून माजूं नये' समजलं ?"

पण त्या सौम्य शब्दांनींच लीलेच्या तिळीं थेंब पडला. ती गेली होती तारूला खट्टू करायला, तिचा उणेपणा दाखवायला; पण तें झालं उलटं ! ती सुणदिशीं पान टाकून उठली, घसाघसा मोरींतला तांब्या हातावर ओतून आंचवली आणि बाणासारखी बापाच्या खोलींत धांवली !

जयंत अन् त्याची आई एकमेकांकडे पाहूं लागलीं आणि तारा बावरून जिथल्या तिथं खिळून राहिली. लीलेला जयंत नवरा हवा होता; पण तोच तेवढा हवा होता ! त्याची आई, त्याचा बाप, हीं तिच्या दृष्टीनं तिऱ्हाईत माणसं होतीं आणि तिला 'फट्' म्हणण्याचा त्यांना कसलाच अधिकार नव्हता. आपल्या समान हक्काला जपत असतांना जयंताचीसुद्धां नवरेशाही ती चालवून घेणार नव्हती. जयंतानं आपल्या सगळ्या लहरींचं कौतुक

करावं, आपलं चोज पुरवावं आणि आपल्याला झेलीत रहावं ऐवढाच त्याचाहि अधिकार ती मर्यादित ठेवणार होती.

मुलगी वळकटीवर पालथी पडून तोंड झाकून मुसमुसते हें समजतांच सांगलीकरांनीं डोळ्यांसमोर धरलेला टाईम्स बाजूला टाकला आणि आपली वामकुक्षी सोडून ते उठून बसले. त्यांनीं तिच्या पाठीवर हात फिरवून 'काय झालं रडायला ?' म्हणून चौकशी केली. तिनं आधीं बापाची मायानदी जितकी दुथडी भरतां येईल तितकी भरून घेतली आणि दहा हुंदके मधें घालून एक वाक्य सांगितलं तें हें, कीं 'ह्यांच्या आईनं माझा अपमान केला.'

आणि मग सांगलीकरांच्या प्रतिष्ठेचा प्रश्न निर्माण झाला. त्यांनीं साठ्यांना हाक मारली. साठे त्यांच्या खोलींत दाखल झाले. पाहतात तों कैकेयीप्रमाणें आपल्या भावी सुनेनं त्या खोलीचं क्रोधागार बनवलं आहे. त्यांना या प्रकाराचा अर्थ उमगेना; पण तो सांगायला सांगलीकरांनीं उशीर लावला नाहीं.

"आमच्या मुलीचा तुमच्या घरांत अपमान झाला आहे. हें मला नाहीं चालायचं; माझ्या मुलीला पण नाहीं खपायचं. ती शिकलेली आहे, स्वाभिमानी आहे. मीं तुमच्या सगळ्या अटी कबूल केल्या आहेत. हुंडा, करणी, पोशाख, मानपान यांचा सांगितलांत तो आंकडा मान्य केला आहे. आणखी हजारपांचशें हवे तर अधिक घ्या; पण या घरांत माझ्या मुलीचं स्वतंत्र व्यक्तिमत्त्व दुखावलं जातां कामा नये. शिवाय ती आपल्या आजीच्या वारसाहक्काचं स्त्रीधन घेऊन तुमच्या घरीं येणार आहे हें पण मीं तुम्हांला स्पष्ट केलं आहे. या सगळ्या गोष्टींचा खुलासा केल्यानंतर माझी प्रतिअट एवढीच, कीं या घरांत तिला सन्मानाची वागणूक मिळावी."

अन् लगेच ते पुन्हा मुलीकडे वळून तिला थोपटूं लागले. साठ्यांना ही दारीं आलेली कामधेनु लाथ झाडून पसार होते कीं काय असं भय वाटलं. ते तडक सैंपाकघरांत येऊन बायकोला बोलले, 'अहो, तुम्हीं आरंभलं आहे तरी काय ? सून व्हायच्या आधींच तिच्यावर सासूपणा गाजवायला लागलांत ? कमाल आहे !'

जयंताच्या आईला त्यावर बोलतां येण्याजोगं पुष्कळ होतं. पण प्रसंग

ओळखून तिनं तोंडांत गुळणी धरली. त्याच वेळीं तारा आपलं पान वाढून घेऊन पहिला घास उचलीत होती. तिला एकदम अश्रूंचा उमाळा आला. हातांतला घास तोंडाला भेटेना. साठे बाहेर निघून गेल्यावर जयंताची आई तारूला म्हणाली,

" तूं कशाला टिपं गाळतेस? चालूं दे बाहेर काय चालतं तें. तूं आपली स्वस्थपणें जेव. "

" माझ्या पोळ्या बिघडल्या हें खरं; पण मी तरी काय करूं? मला कधीं प्रसंगच नाहीं पोळ्यांचा. आमच्या घरीं नेहमींच भाकऱ्या— "

" जाऊं दे ग ! तूं काय मनाला लावून घेतेस? अडला प्रसंग साजरा केलास हेच मोठे उपकार. "

जयंतालासुद्धा नेमकं हेंच वाटलं होतं. जिची ओळख ना देख, तिनं मन लावून सगळं करावं, आम्हांला वाढावं आणि लीलेच्या नादानपणामुळं तिला मात्र दोन घांस आपल्या घरीं सुखानं खातां येऊं नयेत, तिचीं आसवं ताटांत सांडावीं ही किती शोचनीय गोष्ट ! लीलेच्या बापाचे ते लागट शब्द त्यानं ऐकले होते. आपला बाप त्याच्यापुढं नांगी टाकून बसला हें त्यानं पाहिलं होतं. आणि कांगावखोर लीला अजून त्या खोलींत धुमसत असल्याची जाणीव त्याला होतीच.

बाहेर सोनूमामा कानकोंडे होऊन बसले होते. आपल्या येण्यामुळं या घरांत हें वादळ उठलं याची त्यांना खंत वाटत होती. तारा जेवून अन् पाठीमागचं आटपून बाहेर येतांच त्यांनीं आपलं गाठोडं बांधायला उशीर केला नाहीं. कुंकू लावून घेऊन तारूनं जेव्हां जयंताच्या आईला नमस्कार केला, तेव्हां आशीर्वाद उच्चारण्यापूर्वीं तिला आपले भरले डोळे कोरडे करावे लागले. जयंत पडवींत उभा होता. सोनूमामांचा पाय पायरीच्या खालीं पडला होता. ताराहि आतां तेंच करणार होती. पण तिचं सर्वांग जड, गोळा झालं होतं. तिला वाटलं, एकवार आतां मान वर करून जयंताला डोळ्यांत सांठवून घ्यावं. चोरून नव्हे, तर सरळ स्थिर दृष्टीनं. दोघांचे नेत्र लगेच एकमेकांना भिडले. तिच्या मुद्रेवरची ती शरणता या वेळीं तिच्या डोळ्यांत उतरून घनसांद्र झाली आहे असं जयंताला वाटलं. त्यासरशीं आपल्या मनाचा चंद्रकांत सर्वांगीं झरझर पाझरूं लागला आहे

असा त्याला अनुभव आला. तारा जणूं निःशब्दाच्या भाषेत त्याला म्हणत होती.

'...मी जातें; पण केवळ देहानं. मन माझ्याबरोबर यायला तयार नाहीं. मनाबरोबरच डोळेसुद्धां राहते तर बरं होतं. ही घरांत आलेली मुलगी तुम्हांला सुख देणार नाहीं. ती नेहमींच तुम्हांला कंटकांच्या शय्येवर निजवील. मीं लक्षण ओळखलं तिचं. मी तिच्याइतकी पढिक नाहीं; पण मला जर ही जागा मिळाली असती, तर मीं जिवाच्या पायघड्या घातल्या असत्या तुमच्यापुढं. तुमच्या सगळ्या आधिव्याधी मीं स्वतःच्या शिरीं झेलल्या असत्या. तुमचा संसार सोन्याचा करून दाखवला असता. पण माझा अमृतसिद्धियोग हुकला. पण एक विचारूं का ? मी आधीं आलें असतें तर मला स्वीकारली असतीत ?'

जयंत आपल्या विचारांच्या तंद्रींतून जागा होतो तों तारा आपल्या बापासह फाटक उघडून रस्त्याला लागली होती. आतां होती नि एकदम कशी नाहींशी झाली असं त्याला वाटलं. तो क्षणभर कावराबावरा झाला अन् एकदम म्हणाला, 'आई, तिला हाक मार. त्या दोघांना परत बोलाव. घालवायचीं माणसं हीं नव्हेत; तीं दुसरीं आहेत.'

"कसं अगदीं माझ्या काळजांतलं बोललास, जया." त्याची आई ऊर भरून म्हणाली.

"मग हाक मार त्यांना. आतां तुझा अन् माझा पक्ष एक. कोणता सांग ? वधूपक्ष. आतां या वधूच्या पक्षानं आपल्याला दोघांनाहि एका लढाईला तोंड द्यायचं आहे."

जयंतानं हे शब्द उत्तेजित होऊन मोठ्यांदा उच्चारले होते. खोलींत घुंगट घेऊन बसलेल्या लीलेच्या कानांत ते तापलेल्या रसासारखे घुसले. ती तावडतोब उठून बाहेर आली. तिनं जयंताच्या दृष्टीचा वेध घेतला. पण—

त्या दृष्टींत आतां कोवळीक नव्हती. तिथें फक्त जखम करणारे कांटे उरले होते !

# डबोलें

मला वाटतें, कंजूष माणसाचा जगांत जितका उपहास होत असेल तितका एखाद्या अर्धवटाचाहि होत नसावा. कृपण माणसांना पैसा म्हणजे परब्रह्म वाटतें आणि त्याचबरोबर आपला कृपणपणा जगाच्या निदर्शनाला येऊं नये असेंहि वाटतें. ही मंडळी निजरूप लपविण्यासाठीं ज्या नाना युक्त्या योजतात नि जो वाग्विलास दाखवतात, त्यांतूनच उपहासाचे नवे नवे उद्दीपनविभाव प्रकट होत असतात. आणि मग चार लोक एकत्र जमले अन् त्या चिक्कण-मामाचें नांव निघालें कीं विनोदाला दुसरा विषय लागत नाहीं.

आमच्या गांवांतलीं माणसें बायाक्काची जी प्रच्छन्न वा उघड टर उडवीत ती केवळ याच एका गुणासाठीं. कृपणांच्या दोन जाती असतात. 'चमडी देईन; पण दमडी देणार नाहीं' ही पहिली, अन् 'चमडीहि देणार नाहीं नि दमडीहि देणार नाहीं' ही दुसरी. दुसरीला अग्रमान दिला पाहिजे. बायाक्का याच जातीची होती. शेजारीपाजारी अन् कुळवाडीमाळवाडीसुद्धां तिच्या उपहासाची एकहि संधि वायां दवडीत नसत ती याचमुळें.

पण दहा बारा वर्षांचीं गांवांतलीं पोरें तिला हंसत तें मात्र अगदीं वेगळ्या कारणासाठीं. रोज सकाळीं सांतेरीच्या देवळाजवळच्या माळावर तिची अन् त्या वानरसेनेची गांठ पडायची. 'हैक्, तुझे रांडेक्. हैक्, तुझे रांडेक्.' ही किनऱ्या आवाजांतली शब्दमालिका वहाळाच्या जवळपास ऐकायला आली कीं कोणत्या तरी एका पोरानें म्हणायचें; 'आली रे बायाक्का ऽ!'

आणि त्यानंतर पांच-दहा मिनिटांत वहाळाच्या अलिकडचा चढाव चढून वरच्या वडाखालीं दोन व्यक्ती उगवायच्या. एक ओढाळ गाय नि दुसरी बायाक्का. दोघीहि तांबड्याच. गाय जरा कुठें वाट सोडून बाजूला सरकली कीं बायानें उसगीची जिवी काठी उगारून तिला दटावायचें, 'हैक्; तुझ्या रांडेक्! आली कीं नाहीं वाटेवर? अँ! आली कीं नाहीं?—'

मग त्या पोरांनीं तिच्याकडे पहायचें, आपसांत नेत्रपल्लवी करायची आणि त्यांना हसूं अनावर व्हायचें. लगेच बायाक्का तरातरा त्या पोरांपुढें यायची, दोन्ही हात कमरेवर ठेवून ' विठाबाई ' व्हायची अन् तणतणूं लागायची.

" होय रे पोरांनो ! ए सदग्या, ए वासग्या, कशाला रे हसतां ? मी काय तुमच्या पुढें कलावंतीण नाचतें कीं काय रे ? अँ ? कशाला एवढे माजलांत ? तरी बरं, माझ्यासारख्या माथ्यावरच्या पदराच्या तुमच्यासुद्धां घरांत वावरताहेत. त्यांना जाऊन हसा आधीं अन् मग या मला हसायला. मुस्कट फोडून टाकीन एकेकाचं --"

पण मुलें तिला हसत तीं ती तांबड्या लुगड्याची होती म्हणून नव्हे किंवा नऊ वारी अलवाण मधोमध फाडून ती अर्धेंच नेशीत असे म्हणूनहि नव्हे. त्यांना हसूं येत असे तें ती आपला वरचा पदर दोन्ही कानांमागून घेत असे त्याचें. शिवाय तिला पान-तंबाकू खायची संवय होती. पण तोंडांत दांत उरले होते अवघे तीन. वरच्या डाव्या बाजूला ते हारीनें उभे होते. आणि तिनें तोंड मिटलें कीं ते खालच्या ओठावर टेकत असत. ती कावून बोलायला लागलीं कीं तिच्या जिवणीचा चमत्कारिक संकोच-विकास होत असे, तेंहि एक पोरांच्या हसण्याला साधन होत होतें. पण हीं आपलीं व्यंगें लक्षांत न घेतां भलत्याच कल्पनांनीं ती मुलांच्या अंगावर खसवसे.

पण तीं मुलें तिला भीत होतीं म्हणतां ? नांव कशाला ! तीं फरा धरून तिच्यापुढें उभीं रहात अन् तिची वाक्शरांची वृष्टि अचूक झेलीत. आपला आवाज तार सप्तकांत जाऊन चिरकला कीं मग ती उसंत घेई. एवढ्यांत तिची ती ओढाळ गाय कुठें तरी डोळ्यांआड होई. बायाक्का मग कावऱ्या-बावऱ्या नजरेनें तिला शोधूं लागे. खालच्या डोलत्या, लहरत्या वायंगणांत तर तिनें उडी मारली नसेल ना, या शंकेनें ती व्याकुळ होई. आपलें सोडून इतरांचें शेत गाईनें लंपासायला तिची हरकत नव्हती; पण तें काम दिवसाढवळ्या केल्यास शेताचा मालक तिला सरकारी कोंडवाडा दाखवील या भयानें ती त्रस्त होई. आणि मग गाय सांपडेपर्यंत त्या मुलांचें तर्पण करीत राही.

बायाक्काचें घर गांवाच्या मधून जाणाऱ्या पाळंदीच्या तोंडाशीं होतें. खालच्या अंगाला कुळागर होतें तें तिचेंच होतें. पाटाच्या ओळीचे माड अन् परसदारचे फणसहि तिचेच होते. बायाक्का एकटी त्या घरांत रहात होती. दिवसा चरायला गेलेली गाय तिन्हीसांजा घरीं येऊन रात्रभर पडवींत बसे, हीच काय ती तिला सोबत. खरें म्हणजे बायाक्काचें घर वाटेवरचें; तिथें हमेशा आल्यागेल्याचा पायरव असायचा; पण कोणी तिची पायरी चढत नसे. बायाक्काजवळ गूळ तर सोडाच, पण गुळासारखी वाचाहि नव्हती. ती गांवांत असूनहि गांवापासून अलग होती.

तिला कुळधर्म, कुळाचार लागत नव्हता. तिच्या घरीं गणपति बसत नसे. नवरात्राची माळ चढत नसे. शेजाऱ्यांना दिवाळीचे पोहे वाढणें म्हातारपणामुळें तिला झेपत नसे. ती लोकांच्या घरीं कार्यप्रस्थाला जायची; पण तिच्या घरीं मात्र कोणाचा हात उष्टा व्हायचा नाहीं. दहा मण सुपारी ती एकटी सोलून वाण्याच्या पदरांत घालायची. वाणी तिला बिनबोभाट पैसे द्यायचा. भागेली शेताचें भात आणून घालायचा तें तिच्या एकटीच्या पोटाला पुरायचें. तशी ती स्वावलंबी होती.

वर्षातून एकदां तिचें अडत असे तें एकाच बाबतींत. आपलें केंबळी घर शाकारून घ्यायला तिला गांवच्या तरण्या गड्यांची मदत लागे. त्या वेळीं प्रत्येकाच्या घरीं खेटे घालून ती ज्याला त्याला ' बाबापुता ' करायची. घर शाकारणाऱ्यांना दुपारीं खिरीचें जेवण घालायचें ही आमच्याकडची पद्धत. पण बायाक्का आज घालतें, उद्यां घालतें, असे अगस्तिऋषीचे वायदे सांगून त्यांना वाटाण्याच्या अक्षता लावी. पण तरीहि गांवकरी दरवर्षी तिचें घर शाकारून देत. बायक्काला नसली तरी त्यांना लाज होती. म्हातारीला उभ्या पावसांत भिजतांना पाहिली असती तर आल्यागेल्यानें त्यांच्याच तोंडांत शेण घातलें असतें.

या वर्षीं मात्र गांवकऱ्यांनीं हट्ट धरला कीं, ' आजच्या आज खिरीचें जेवण वाढीत असशील तरच आम्ही घर शाकारायला येऊं. ' बायाक्काला ' हो ' म्हणणेंच भाग होतें. ' पोटभर वाढलं पाहिजे. आम्ही एकमेकांना आग्रह करून जेवणार. ' खीर संपली ' हीं अक्षरं काढायचीं नाहीं तोंडांतून.

कबूल ? ' बायाक्का म्हणाली, ' कबूल रे बाबांनो ! किती होरस ध्यायचा असेल तेवढा घ्या; पण माझं घर एकदां सुखं करा. '

खोपींत न्हाणीच्या चुलीवर खिरीचें पातेलें चढलेलें पाहूनच गडी घरावर चढले. ' आज म्हातारीचं दिवाळं काढायचं ' असे बेत करीत त्यांनीं जुना कैंबळा उकरला. पण बायाक्का त्यांचें बारसें जेवली होती. तिचे पोटांतले पाय त्यांना दिसणेंच शक्य नव्हतें.

दुपारीं श्रमभोजनाला बसतात, तर खिरीचा भुरका एकाच्याहि घाटी-खालीं उतरेना. प्रत्येकजण वांकडें तोंड करून दुसऱ्याकडे पहातो. बायाक्का खिरीचा मोठा द्रोण भरून घेऊन पुन्हा बाहेर आली तेव्हां शेजारच्या हरीनें विचारलें.

" बायाक्का ! आज खीर काय समुद्राच्या पाण्यांत रांधलीस ? "

" हें रे बाबा काय अघटित बोलणं !–"

" जिभेला लावून बघ, म्हणजे कळेल. "

" खारट का झाली ? जळ्ळं माझं लक्षण ! स्मृतीच रहात नाहीं कशाची ! आमटींत घालायचं मीठ मी खिरींतच टाकलं वाटतं ! करून निष्फळ झालं. तुमच्या तोंडांत कांहीं पडलं नाहीं. हरे राऽम, हरे विठ्ठलाऽऽ ! "

संध्याकाळीं तें खिरीचें पातेलें बायाक्कानें गाईपुढें ठेवलें. गाय जेव्हां आडव्याउभ्या जिभेनें तें हटवूं लागली तेव्हां म्हातारीच्या काळजाला हर्षाच्या उकळ्या फुटल्या. ' आज माझी कामधेनु चार धारा जास्त देईल ' म्हणून तिनें गाईच्या पाठीवरून हात फिरवला. ' ते मेले दांडगेश्वर मरेस्तंवर ओरपणार होते. ' खाऊन खाक नि × × ! ' मिठाच्या एका एका ओंजळीनं काम भागलं. '

खर्च करायचा नाहीं; पण ज्या पदार्थाची रुचि उत्पन्न होईल तो खाल्ल्याशिवाय रहायचें नाहीं, या दोन्ही गोष्टी बायाक्काला छान साधत होत्या. सकाळीं साधारण अकरा वाजायच्या सुमारास शेजारचीं माणसें आपापल्या कुळागरांतलीं कामें आटपून घरीं गेलीं कीं, मग बायाक्कानें कोयती कमरेला खोंचून पाटाखालीं उतरायचें. आपलें कुळागर सोडून

इतरांच्या कुळागरांत तिचा चोरटा संचार सुरू व्हायचा. एखादें चांगलेंसें केळफूल दिसलें कीं कचकन् तोडून तिनें तें आपल्या हातांतल्या विरींत लपवायचें. कच्च्या केळ्यांचा वरचाच फणा वरून कोयतीची चीर ओढून खालून उलटा मोडून घ्यायचा. एखाद्या फणसाला नवेंच फुटलेलें 'दाभण' भिरभिरत्या नजरेनें आसमंतांत कोणी नाहींसें पाहून अलगद मोडायचें. हेंच कशाला? एकाद्याच्या डोळ्यांतलें काजळसुद्धां तिनें चोरून घेतलें असतें! समजा, आलेंच कोणाच्या निदर्शनाला तर बायाक्का लगेच आपल्या म्हातारपणाच्या पांघरुणाखालीं लपायची. असेल तेथें मटकन् बसून 'हरे राऽऽम! हरे विठ्ठलाऽऽ!' असे उद्‌गार काढायची. जणूं म्हातारीला उन्हाची तिरीप लागून भोंवळच आली आहे. शाकभाज्या करून खाण्याची बायाक्काची पद्धत ही अशी होती.

अन् खारांतली अंबाडी. लोणचें किंवा उकडांबा खायची लहर आली कीं, दहा घरांचा शेजार होताच आगेंमागें. 'ओंभवती'ला ती एखाद्या घरीं गेली कीं, अगदीं सुईच्या नेढ्यांतून जायची. अतिलीनतेनें अन् जिभेवर साखर घोळवीत.

"येश्वदे, अगो येश्वदे! कुठं गो आहेस तूं? मधल्या वासरींत का स्वैंपाकघरांत? एवढ्यांत लागलीस वाटतं रांधायला? तुझा बाई उरक दांडगा! नाहीं तर मी अजून अंगावर पाणीसुद्धां ओतलं नाहीं. एक उकडांबा देतेस का ग? तोंडाला कसं अवढाणं पडलं आहे. तूं नाहीं म्हणायची नाहींस म्हणा. तुझा आपला नेहमींच हात वर. मला कांहीं एवढंतेवढं लागलं कीं मी आपली तुझा उंबरा चढतें. नाहीं तरी तुझ्यावर हक्कच आहे माझा. माझ्या मावसबहिणीच्या नणंदेची नातच कीं नाहीं तूं? अन् मी मेली मागणार ती काय! एक उकडांबा!"

अन् हीच तऱ्हा सगळ्या घरीं. जिथें जाईल तिथल्या गृहलक्ष्मीबद्दल तेलातुपाशिवाय तळायचें अन् इतर घरच्या बायकांची कूट खायची. हवें तें हातावर पडलें कीं लगेच 'हरे राऽऽम, हरे विठ्ठलाऽऽ!' तिची पाठ वळली कीं त्या गृहिणीनें हटकून म्हणायचें, 'चिकट भवानी मेली! 'दे बाई लोणचं, बोलेन तुझ्या हारचं.' थेरडीचं स्वप्नसुद्धां पडूं नये.'

अन् बेळगांवला जाऊन राहिलेली तिची सून आणि मुलगा हींसुद्धां हेंच म्हणत होतीं. आई धनाची लोभी. तिच्या तोंडीं सदैव नन्नाची बाराखडी अन् वर सदां कचकच. लहानपणीं त्यानें सगळें सोसलें; पण आतां मोठेपणीं दोहोंचे चार हात झाल्यावर त्याला तें आवडेना. तो बिचारा मुखदुर्बळ असला तरी चार मंडळींतला होता. आईशीं भांडतां येत नाहीं, तिच्या हातून कारभार काढून घेतां येत नाहीं अन् तिचा काच तर सहन होत नाहीं, अशा परिस्थितींत जाजावून त्यानें निराळाच पंथ काढला. तो घरदार टाकून, बायकोला बरोबर घेऊन बेळगांवला चालता झाला. चार घरच्या घंटा बडवून अन् चार घरीं पाणी भरून तो कशी तरी दोन पोटांची गुजराण चालवी अन् समाधानानें राही. कधीं आठवण आली, विषय निघाला कीं सून उद्वेगानें म्हणे, ‘ म्हातारीला पोटच्या पोरापेक्षां पैसा अधिक वाटतो. घे म्हणावं उरापोटावर बांधून ! थेरडीचं स्वप्नसुद्धां पडायला नको आम्हांला ... ’

शेजाऱ्यांना हें सगळें माहीत होतें. पण तिऱ्हाइताला वाटे कीं, ‘ बायाक्काचा मुलगा तिख्याच्या काळजाचा असला पाहिजे. म्हातारीला इथें दुःखं निशितं गिळायला लावून आपण वरघांटीं जाऊन मजा मारतो, म्हणजे अजबच आहे. ’ बायाक्का डोळ्यांचीं तळीं करून लोकांची तशीच समजूत करून देई. पण सून–मुलगा घरांतून निघून गेलीं हें तिच्या पथ्यावरच पडलें होतें. मुलगा दोन्ही वेळां पोटभर जेवतो हें एक वेळ ठीक; पण परक्याच्या घरून आणलेल्या सुनेनें दुपार–संध्याकाळ अच्छेराचे ठाव उठवावे हें कसें तिनें उघड्या डोळ्यांनीं पहायचें ! आतां दोघेंच आहेत; पण थोड्या दिवसांनीं तिसरें येईल. तिसऱ्यानंतर चौथें, पांचवें–छेः ! अशानें वर्षाकांठीं दोन पैसे शिल्लक पडायची आशाच नको. जाताहेत तें बरंच आहे. परभारें पोट तरी भागवतील.

पण पुरत्या चार वर्षांनीं मुलगा जेव्हां माघारला, तेव्हां बायाक्काच्या पोटांत एकदम धस्स झालें. तो एकटा आला नव्हता. बरोबर बायको होती अन् तीन वर्षांचा त्याचा मुलगाहि होता. तिला वाटलें, हें गोळांगूळ आतां घरीं कायम रहायलाच आलें कीं काय ! म्हणजे संसाराचें दिवाळें ! पण मुलगा त्या उद्देशानें आलाच नव्हता. आपला पहिला वंशाचा अंकुर

आईच्या मांडीवर बसवून तिचे आशीर्वाद त्याला मिळवून द्यावे अन् गांवच्याहि मंडळीला एकदां भेटावें एवढ्याच हेतूनें त्यानें घराचें तोंड पाहिलें होतें. नातवाला पाहून बायाक्का भरतीच्या लाटेसारखी पुढें गेली अन् दोन्ही भुजा पसरून त्याला म्हणाली, ‘ ये रे माझ्या रत्ना ऽऽ ! ’ पण त्या बोबड्या बालकानें चटकन् तोंड वळविलें. तो बायाक्काच्या तोंडांतल्या, खालच्या ओठावर चढलेल्या त्या तीन राहु–केतु–शनैश्चरांना भ्याला, का तिच्या उरांत मायेचा पाझर नसल्याचें उमगला तें देव जाणे !

शेजारच्या बायका बायाक्काला म्हणूं लागल्या, ‘ नव्या नवसाचा नातू आला आहे. त्याला कर्डीतोडे घाल, कमरेंत घागऱ्या कर. ’ त्यावर बायाक्का सुस्कारून बोलायची, ‘ कुठले कर्डीतोडे अन् कुठल्या बाये घागऱ्या ! दिवस हे असे. एक वेळ गोळाभर अन्न खाऊन रहातें. धांदोट्या नेसून फिरतें. तुम्हीच पहातां म्हणून ठीक आहे. अन् म्हणे कर्डीतोडे घाल. तुम्ही करतां माझ्या बचेऱ्या ! माझ्या नातवाला कर्डीतोडे नसले तरी चालतील. देवानं उदंड आउक्ष दिलं म्हणजे पुरे ! ’

“ कशाला कानावर केसट्या काढतेस बायाक्का ? आम्हांला कांहीं ठाऊक नाहीं होय ? ज्या गांवच्या केळी, त्याच गांवच्या पोफळी बरं ! वाण्याकडून नारळ-सुपारीच्या नोटा न घेतां सुरती रुपये जमवतेस ते खळग्यांत पुरायलाच का ? एखादवेळीं फट्दिशीं मेलीस म्हणजे खळग्यांतलं खळग्यांतच उरेल ! न देवाय न धर्माय— ”

असें कोणी बोललें कीं तें बायाक्काच्या वर्माला झोंबे. मग तिचा चुणीदार चेहरा लालबुंद होई. तिच्या तोंडाचे ते तीन राखणदार ओठांत घुसल्यासारखें करीत आणि मग पदर कानामागें सारीत ती तरातरा चालूं लागे. चालतां चालतां ओठांतल्या ओठांत ती पुटपुटे, ‘ डोळे फुटतात मेल्यांचे. शेजारी नव्हेत; वैरी आहेत हे. ’

शेजाऱ्यांनाच कशाला ? दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपल्या एकुलत्या एका मुलालाहि याच शब्दांचा तिनें अहेर केला. मुलाचा गुन्हा काय; तर त्यानें तिला न विचारतां पाटाकडच्या माडाचीं चार अडसरें काढलीं. त्यावर दोन तास म्हातारीचें जिव्हास्त्र चाललें होतें. ‘ काळतोंड्यानं एक

दमडी धाडली नाहीं इतक्या वर्षांत. आई जिती आहे का खपली तेंसुद्धां पाहिलं नाहीं अन् आतां आला आहे आयत्यावर कोयता घालायला ..."

मुलानें शहाळीं काढलीं खरीं; पण तीं फोडायची वासना कांहीं त्याला उरली नाहीं. सुनेनें मात्र तीं पुढें घेऊन फोडलीं. तिनें स्वतः एक शहाळें तोंडाला लावलें अन् मुलालाहि पाजलें. आंतलें पातळ खोबरें मुलाच्या हातावर ठेवतांना ती त्याला म्हणाली, 'तुझ्या आजीला सांग कीं, आम्ही या घरांत भिकारी किंवा चोर म्हणून आलों नाहीं. आम्ही मालक आहोंत म्हणावं. तोंड संभाळून बोला !'

झालें ! तेवढ्या शब्दांनीं बायाक्काच्या तिळीं थेंब पडला. पदर सरसावून हातवारे करीत, जिवणीचा तो विचित्र संकोच-विकास दाखवीत, ती सुनेपुढें उभी राहिली.

"चमकढवळ्ये ! तूं मालकीण होय ग ? तूं ?"

"हो हो ! मी."

"या माडाच्या मुळांत एक दिवस तरी कधीं ××× होतीस का ? खालच्या पोफळींना कधीं कळेभर पाणी घातलं होतंस का ? नवऱ्याला घरांतून बाहेर काढलास अन् राजाराणीचा संसार थाटायला बेळगांवांत हुळवादलीस ! आयतं खायला हवं होतं ना ! पाणी भरतांभरतां नवऱ्याच्या उराची शिंप झाली अन् ही पाटमादेवी पायांवर पाय डाळून मासाचे गोळे वाढवते !"

"आम्ही आमच्या सुखासाठीं गेलों नाहीं. तुम्ही घालवलंत आम्हांला ! मला अन्नाला वाळवलंत. तेलापाण्याला सुकवलंत. मुलगा साधाभोळा, म्हणून त्याच्या कपाळावर मिरीं वाटलींत."

"वाटीन, वाटीन ! त्याच्याच नव्हे, तुझ्यासुद्धां कपाळावर वाटीन. चालतीं व्हा माझ्या घरांतनं ! तुमचीं इथें कसलीहि सत्ता नाहीं. माझीं हाडं माळावर पडलीं म्हणजे मग या आपलं इंद्रपद घ्यायला !"

सून दोन हात करायला निघाली खरी; पण ती बायाक्काच्या पासंगाला-सुद्धां पुरली नाहीं. कमरेचें सोडून माथ्याला गुंडाळल्याशिवाय तिच्यापुढें कोणी टिकणेंच शक्य नव्हतें. तिची ती अनावर वाक्शक्ति पाहून चार

तोंडाच्या ब्रह्मदेवानेंहि तिला शरणचिठ्ठी दिली असती. झोंब-या शिव्या अन् मर्मकृंतक दुःशब्द यांचें तें त्या गांवांतलें विद्यापीठ होतें. हा आला, तो आला, करतां करतां शेजारचीं दहा-पंधरा माणसें तिथें गोळा झालीं. मुलगा बिचारा शरमला. त्यानें आपल्या मातृदेवतेला शांत करण्याचा प्रयत्न केला; पण ती वृद्ध कालिका शमली नाहीं. त्याला घर असह्य झालें. त्यानें गाठोडें बांधलें. सुनेनें मुलाला उचललें. चढत्या उन्हांत तीं घरांतून बाहेर पडलीं. आईच्या जळफळाटापेक्षां तो सूर्यताप त्याला किती तरी सौम्य-शीतल वाटला. ' पुनश्च तुझं तोंड पहाणार नाहीं ' असें आईला प्रतिज्ञोत्तर बोलूनच त्यानें दारांतला पाट ओलांडला.

पण त्याला बिचाऱ्याला हें ठाऊक नव्हतें कीं, गरिबानें प्रतिज्ञाबितिज्ञा करायच्या भानगडींत कधीं पडूं नये. गरिबाची प्रतिज्ञा ही मरणाहून क्लेशकारक असते. प्रतिज्ञा बोलाव्या धनवंतांनी किंवा चार खुंटांची जहागीर घेणाऱ्यांनीं. बापुडया मध्यमवर्गाचें तें काम नव्हे. तो परिस्थितीचा गुलाम असतो. कुटुंबी असेल तर विचारूंच नका. तो पदोपदीं अडखळतो. ठायीं ठायीं ठेंचाळतो. बायाक्काच्या मुलाला सहा महिन्यांच्या आंत नाक मुठींत घेऊन माउलीला शरण यावें लागलें तें याचमुळें.

त्याची बायको बाळंतपणासाठीं दवाखान्यांत गेली होती. तिची प्रसूति सुलभपणें झाली नव्हती. गर्भारपणांतली आबाळ हें त्याचें मुख्य कारण होतें. नंतरहि तिला बराच त्रास झाला होता. औषधें, इंजेक्शनें, यांचा मारा करून तिला वर काढावें लागलें होतें. तिला मिळालेलें जीवदान शंभर रुपयांच्या घरांत गेलें होतें. तो आंकडा डोळयांपुढें लखलखून त्याला म्हणत होता, ' तूर्त अन् ताबडतोब ! '

पण एका पाणक्याला शंभर रौप्यमुद्रा एका मुठीनें कोण दाखवणार ! तो ज्या ज्या घरीं कष्टत होता तीं तीं माणसें शहाणीं होतीं, व्यवहारी होतीं. एका महिन्याचा पगारसुद्धां अंगावर द्यायला तीं राजी झालीं नाहींत. एक पाणक्या सुटला तर दुसरा मिळायची पंचाईत नव्हती. बाजारांत मागणीपेक्षां पुरवठाच अधिक होता. अशा स्थितींत सर्व बाजूंनीं निराशा झाल्यावर अखेर त्याला म्हणावें लागलें, ' न मातुर्दैवतं परम् ! '

पण तो ज्या कारणासाठीं आपल्या सत्तेच्या घरीं येऊन धरणें धरून शंभर रुपये मागत होता तें कारणच बायाक्काला बनावट वाटलें. तिनें त्याला विचारलें.

" बायको कुठें आहे म्हणालास ? "

" डॉक्टर चित्रूरांच्या प्रसूतिगृहांत. "

" अरे, म्हणजे कुठें ? "

" अगे, प्रसूतिगृहांत म्हणजे बाळंतपणाच्या इस्पितळांत. "

" नाऱ्या, नाऱ्या ! मला बनवतोस ? इस्पिट्लांत घालायला तिला काय प्लेग झाला होता का पटकी ? अँ ? अन् बाळंत व्हायला इंजिक्शनं लागतात होय रे ? दंडांत सुई टोंचून काय अडलेल्या बाईची ' सोडवाट ' होते ? मला शिकवतोस तूं हें ? मी काय गरव्हार झालें नाहीं, का बाळंत झालें नाहीं ? जरा वेळ लागतोसा वाटला कीं कलमकापाचा एवढासा काढा घेतला म्हणजे बस्स ! तुझ्या खेपेला तर वांयगणांतून हा एवढा चाऱ्याचा भारा पडवीवर आणून टाकला अन् खोलींत गेलें. या कानाचं त्या कानाला कळलं नाहीं. तुझ्या बायकोचीं थेरंच फार ! घरांत बाळंत होतां येत नाहीं तिला ? इस्पिट्लांत मजा वाटते ? तो डाक्तर उभा राहिलाच असेल शेजारीं ! थूः ! "

" भलतंसलतं काय बोलतेस आई ? "

" मी भलतंसलतं बोलतें अन् तूं मोठा साधु ! चोर कुठला ! आला आहे मला पिशाला पिंपळ दाखवायला — "

" तूं चल माझ्याबरोबर बेळगांवला. तिची काय दशा झाली आहे ती समक्ष पहा. "

" होईल. एवढ्यानं काय झालं आहे ? आणखी होईल. अंगाला सहस्र भगं पडतील. त्या दिवशीं मला अन्योविन्य बोलून गेली, कांहीं वाटलं का ? माझे श्राप बाधताहेत हे ! "

" झालं गेलं आतां विसर. मला या पेंचांतून सोडव. अकराव्या दिवशीं पैसे भरले नाहींत तर तिला घरीं पाठवणार नाहींत. "

" न पाठवूं देत ! अन्न घालतील ना ? हवी कशाला असली कुथुन्नाई तुझ्या घरांत ? माझ्याकडे नाहींत रे बाब्रा पैसे ऽऽ ! "

" हें तूं मला सांगतेस ? " मुलानें जरा धीर केला.

" हो हो, तुला सांगतें. बराच दिसतोस कीं. ' दिसायला भोळा अन् मुदलावर डोळा. ' मला एकदां ओरबाडशील तेव्हां तुझा आत्मा थंड होईल. तुझ्यापेक्षां तिचा ! पण मी त्या सटवीच्या कपाळाला फुटकी पैसुद्धां लावायची नाहीं. माझे डोळे झाकले म्हणजे असलं कांहीं तर तें तुझच आहे. मला कांहीं एखादी मुलगी नाहीं तिची भर करायला. "

बायाक्का आडकित्ता पाळ्यांत आदळून उठली अन् पाळंदीच्या तोंडावर कोणाचं तरी वासरूं केळीचें सोप ओढीत होतें त्याला हांकलण्याच्या मिषानें तिथून चालती झाली. पोराचें सुकलेलें तोंड पाहून कदाचित् आपलें काळीज विरघळेल आणि कदाचित् तो भूमिगत ठेवा बाहेर काढण्याची आपल्याला वासना होईल अशी तिला धास्ती पडली असावी.

मुलाला वाटलें, अगदीं उफाळून आलें, कीं या निर्दय म्हतारडीला दरदरां ओढीत गांवाच्या शिंवेबाहेर नेऊन घालावें अन् घरादाराचा ताबा घ्यावा. पण पुन्हा तो मनाशीं म्हणाला. ' मला तेवढी हिंमत नाहीं. माझ्या वडिलांनासुद्धां नव्हती. ते जन्मभर तिच्या धाकांतच राहिले. सुसरबाय, तुझी पाठ मऊ म्हणून त्यांनीं दिवस काढले...'

तो शेजारीं हरीकडे जाऊन उदासवाणा बसला. रात्रीं तिथेंच जेवला अन् तिथेंच झोपला. ज्या अर्थीं तो शेजारच्या पागोळींत आहे, त्याअर्थीं उपाशी कांहीं रहाणार नाहीं याची तिला खात्री होतीच. तो हरी अन् आपला पोरगा, दोघे मिळून आपली निंदा करण्यांत रात्र जागवतील हेंहि ती जाणत होती. पडवीवरचा टुकटुका दिवा पदरानें मालवून आडवी होतांना ती म्हणाली. ' करूं देत मेल्यांना माझी निंदा ! निंदकाचें घर असावें शेजारीं. हरे राऽऽम, हरे विठ्ठलाऽऽ !'

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिनें नित्याप्रमाणें आपल्या कामधेनूची पिळून पिळून धार काढली फेंसावर फुंकर घालून दुधाची चरवी शिंक्यावर ठेवून दिली. दाराला कुलूप लावलें. मग गाईचें दावें सोडलें. जवळची ओसगीची

छडी हातांत घेतली आणि रोजच्याप्रमाणें 'हैक्, तुझे रांडेक, हैक्' करीत गाईला सांतेरीच्या माळावर घेऊन गेली. गांवचा गुराखी येऊन गाय त्याच्या स्वाधीन करीपर्यंत तिचा एक तास मोडला. तेवढ्यांत तिनें 'खी: खी:' हसणाऱ्या गांवांतल्या वानरसेनेबरोबर पोटभर भांडून घेतलें. दुपारच्या सर्पणासाठीं चार काटक्याकुटक्या अन् रानशेणी गोळा करीपर्यंत तिचा आणखी अर्धा तास गेला. घरीं येऊन तीं इंधनकाष्ठें तिनें अंगणांत आपटलीं.

पडवींत येऊन पहाते तों कुलूप तुटून खालीं पडलेलें. 'ऑं ? असं कसं झालं !' म्हणत तिनें धाड्दिशीं दार लोटलें. माजघर ओलांडून ती सरळ स्वैंपाकघरांत घुसली. पहाते तों चुलीशीं मणभर मातीचा ढीग ! वैलाजवळ भिंतीच्या मुळांत हा एवढा भोंकसा ! तिथेंच आडवी पडलेली पहार अन् तिच्या शेजारीं एक पोचे आलेला कळकट राजापुरी तांब्या.—आंतली संपदा पसार झाल्यामुळें हीनदीन दिसणारा.

बायाक्का तें दृश्य पाहून मटकन् खालींच बसली. तिच्या भोंवतालचें उखळ, मुसळ, जातें, इतकेंच नव्हे, तर सगळें घरच गरगरूं लागलें. तिनें पैशाला पैसा गांठवून जोडलेलें तें संचित धन एकाएकीं सगळेंच्या सगळें अदृश्य झालें होतें. बायाक्काच्या अस्थिपंजरांतला काळजाचा गाभाच लुबाडला गेला होता. 'फुटलं गो ऽ थेरड्ये तुझं कपाळ !' असा आर्त हंबरडा फोडीत ती बाहेर आली.

"पोरानं मला नागवलं रे ऽ ऽ ! माझा सत्यानास केला ! माझा केंसानं गळा कापला. पोर नव्हे; साता जन्मांचा दावेदार तो ! मीच रांडेच्याला दूध पाजून वाढवला अन् आतां माझ्याच मुळावर आला. काय करूं रे ऽ आतां ! गळ्याला फांस लावूं का मादईच्या कोंडींत जाऊन उडी घेऊंऽऽ..."

पण ती जीव द्यायला निघाली नव्हती. ती जात होती शेजारीं हरीच्या घरीं. काल रात्रीं त्याच घरीं तिचा पोरगा राहिला होता. तो आतां तिला भेटता तर ती त्याला उभा पिसुडणार होती. त्याला अश्रूंच्या महापुरांत बुडवणार होती. रडून आक्रंदून त्याला 'नको तो पैसा' असें करणार होती. पण तो होता कुठें तिथें ! त्यानें एव्हांना दोन कोस मजल मारली होती. पडवींत तिला भेटला तो हरी मात्र !

" कुठें गेला तो माझा वैरी ? आहे का तुझ्या घरांत ? " बायाक्कानें आपली जिवणी अन् तें दांतांचें त्रिकूट चाळवलें. हरी कशाला उत्तर देतो ! तो नुसता मिस्किलपणें हसत उभा राहिला. तें हास्य म्हणजे तिच्या उरावरच्या घावावर चरचरीत डागणी होती.

" माझ्या पोराला एवढी अक्कल सुचायची नाहीं. एवढं काळीज व्हायचं नाहीं. तूं त्याला पाठबळ दिलंस. तूं भेद्या झालास. एकवीस पूर्वज नरकांत घातलेस. सात जन्म उकिरड्यावर बसून तप केलं होतं, म्हणून तुझ्या शेजाराला येऊन पडलें. माझी इतक्या वर्षांची जोडलेली 'माया' तूं खाल्लीस ! आतां मला खा. भाजून, चिरून खा !..."

बायाक्का अंगणांत फतकल मारून हरीपुढं कपाळ बडवून घेऊं लागली. मधेंच ते डावीकडचे तीन दांत ओठांत दाबायचे, हरीकडे एकदां जळत्या डोळ्यांनीं पहायचें अन् पुन्हां कपाळ आपटायचें. हरीला वाटलें, ही कुठली हत्या माझ्या दारांत आली ! त्याचा संताप अनावर झाला. त्याला तिच्या मुलाची दया आली होती. पण हिची येण्याचें कांहींच कारण नव्हतें. पुढें येऊन त्यानें तिला सडकून दरडावलें.

" बायाक्का, चालती हो माझ्या अंगणांतून ! मी तुझ्या बापाचे दोन चव्वल देणं लागत नाहीं. चल, ऊठ. नाहीं तर तुझं मोटळं अस्संच्या अस्सं उचलून पाळंदीच्या चरांत फेंकून देईन बघ ! मुलं–नातवंडं मरतात तिकडे अन्नपाण्यावांचून अन् ही इकडे डबोलीं सांठवते ! म्हाताऱ्ये, याद राख ! पुन्हा माझं नांव घेशील तर बघ. खळ्यावर तुझं भात आहे. तें एक दिवस मळून सगळं विकीन अन् त्याचे पैसे नाऱ्याला पाठवून देईन. मग बस उपाशी तडफडत. "

ही हेमगर्भाची मात्रा बायाक्काला ताबडतोब लागूं पडली. तिनें लांबलचक गळा काढला खरा; पण हरीचें आंगण सोडून तत्काळ घरची वाट धरली. त्या भरल्या गांवांत तिचें तें अरण्यरुदन ठरलें. गांवांतल्या कुत्र्या-मांजरालासुद्धां तिच्याबद्दल सहानुभूति वाटली नाहीं.

# पाठराखीण

शाबा सावकाराच्या त्या चौसोपी बड्या घरांत चारी प्रहर वावरत असूनहि लाडी कोणाच्या डोळ्यांत भरत नाहीं. तिनें केरसुणीचें व्रत घेतलें आहे. सगळीकडे फिरायचें आणि काम संपलें कीं, कुठल्या तरी कोपऱ्यांत अंग चोरून बसायचें. झुंजुमुंजु झाल्यापासून तिचीं काळी, चपटीं पावलें सर्वत्र फिरूं लागायचीं. ना घसघस, ना खजबज. जेथें काम खोळंबलें असेल तिथें तिचा नेमका हात पडायचा. सकाळीं नवाच्या सुमाराला उमेनें दशम्या भाजल्या कीं घरांतलीं सगळीं माणसें न बोलावतां तिच्याभोवतीं कोंडाळें करायचीं; पण लाडीला भुकेची पर्वा नसे. उमा सगळ्यांना वाढी; पण आपण न खातां आधीं लाडीची दखल घेई. केळीच्या फाळक्यावर आंत चटणी घालून दुमडलेली दशमी घेऊन ती ओसरीवर येई आणि लाडीला हाक मारी.

"लाडी, चल ग दशमी खायला ऽऽ!"

उमेची ती हाक सौम्य असे, जिव्हाळ्याची असे. कशी तरी लाडीच्या डोंबलावर न्याहारी आदळून वेठ वारायची, असली क्षुद्र भावना उमेनें कधींच धरली नाहीं. राबता जीव; तेव्हां तिनें स्वस्थ बसून पोटभर खावें असेंच तिला वाटे आणि म्हणून पहिल्या हाकेला तिनें ओ दिली नाहीं, तर उमा लटक्या रागानें स्वर जरा अधिक उंचावून पुन्हा तिला हाक मारी आणि मग थोड्याच वेळांत लाडीचे हात पन्हाळीखालीं खळबळलेले ऐकूं येत. शेणा-मातींत भरलेले पाय ती दगडावर आडवे-उभे घाशी आणि मुकाट्यानें बाजूच्या सोप्यांत येऊन फाळका जवळ ओढी.

लाडी बसलेली दिसली कीं उमेचें एखादें मूल तिच्या पाठीवर लोळायला धांवून येई. उमेला चार-पांच मुलें होतीं. तिला नवें मूल झालें कीं मागचें असेल तें त्याच रात्रीं लाडीच्या कुशींत यायचें आणि त्या दिवसापासून तिचें व्हायचें. न बोलतां ठरलेला हा संकेत होता. ती फक्त त्याच एका

मुलाशीं हसे, खेळे आणि त्याचेच लाड करी. मुलांचें भांडण सुरू झालें कीं त्याचाच कैंपक्ष घेई आणि बाकीच्यांबद्दल संपूर्ण अनास्था दाखवी. जणूं तेंच एक मूल घरचें अन् बाकीचीं शेजारचीं.

वाणी असून मुकी अशी लाडीची अवस्था होती. तिचा शब्द म्हणजे कृपणाच्या पेटींतलें नाणें. उमेनें दहा प्रश्न विचारले, तर त्यांतल्या आठांचीं उत्तरें ती मानेनेंच देई आणि एखाददुसऱ्या प्रश्नालाच तोंड उघडी. एका काळीं लाडीला खूप बोलायला हवें असे आणि त्याहून अधिक हसायला. ती हास्याचे मजल्यावर मजले चढवूं लागली कीं शाबा सावकार कुठून तरी खेकसायचा आणि मग ते कोसळून पडायचे. पण अलीकडे बरींच वर्षें लाडीचें हसणें बोलणें इतिहासजमा झालें होतें. ज्या कोणत्या प्रसंगानें लाडीची वाचा दबली होती आणि तिच्या वाटोळ्या मुखावरचें हास्य निपटून गेलें होतें, तो प्रसंग उमेला ठाऊक होता. जन्मभर स्मरणमात्रें तिच्या हृदयाला थरकांप उत्पन्न करील इतका तो दुर्धर होता. त्यामुळें उमा तिला दोष देत नव्हती, तर अधिकच जपत होती.

पण महिन्या दोन महिन्यांनीं मध्येंच कांहीं दिवस लाडी झपाटल्यासारखें करी. तिला कसल्या तरी वेदना असह्य होत. आपली सगळीच काया आंतून बाहेरून जळत आहे आणि ती विझवायला जगांत कुठें पाण्याचा थेंबसुद्धां नाहीं अशा कसल्या तरी अवस्थेनें ती सैरभैर होई. धड खायची नाहीं, धड काम करायची नाहीं, कीं धड झोपायची नाहीं. ऊन असो, सावली असो, अंगणाच्या मेरेपलीकडच्या त्या धोंडीवर बसून असायची. ती शिळा तिची समदुःखी सांगातीण होती. तिच्यासारखीच धरणीला भार; तिच्यासारखीच निरानंद. वसंत आला तरी पालवी नाहीं. पाऊस-काळ कोसळून गेला तरी बीजांकुर नाहीं आणि शरदानें नवान्न पिकवलें तरी फूल-फळ नाहीं. सगळे दिवस अन् सगळे काळ सारखेच. सदैव मुक्या दुःखांची आणि तिची नित्य गांठ. तिथें बसल्याबसल्या त्या घरांतला तिचा पहिला दिवस तिला आठवे.

'...किती वर्षें लोटलीं कोण जाणे! पण कसल्या तरी वाख्यांत माझ्या डोईवरचं आईबापांचं छत्र फाटलं. कुणी मायेचं उरलं नाहीं. थंडीनं

कुडकुडलें, भुकेनं व्याकुळलें, कुळवाडी वस्तींतून उठलें अन् ती पलीकडची डोंगरी चढून या दारीं याच धोंडीवर येऊन बसलें. दुपारची वेळ होती. शाबा सावकार पाटावर आंघोळ करून ओल्या पंचानं घरीं येत होता. त्यानं माझी चौकशी केली. मला शब्दच फुटेना. तो गेला निघून घरांत. जेवून ढेकर देत बाहेर आला तरी मी आपली इथंच. त्यानं मग बायकोला हाक मारून मला जेवायला वाढायला सांगितलं. भाताचं अेक डिखळ, वर कालवण अन् द्रोणभर आंबील माझ्यापुढं आली. मीं बकाबका गिळलें अन् पुन्हा इथंच बसलें. दिवस धारेला गेला तरी हाललें नाहीं. सावकाराच्या बायकोनं माझी हकीगत हळूहळू काढून घेतली. मग तिनं मला ओसरीवर नेलं. रात्रीं पुन्हा मी जेवलें अन् तिनं अंगावर टाकलेलीं दोन फाटकीं पोतीं खालीं-वर घेऊन भिंतीच्या मुळांत मुर्कुडी केली. त्या दिवसापासून मी या घरची झालें. धनिणीचीं पडतील तीं कामं करूं लागलें. सावकाराला वाटलं, बरी एक हरकामी पोरगी अन्नावारी मिळाली. आपल्या बायकोला तेवढंच सुख होईल. मोठी होईल तसतशी घाण्याला अधिक जुंपतां येईल. अंगापिंडानं लोखंडाची कांब आहे. शिवाय अनाथ...'

लाडीला त्या घरांत कौलांची सावली मिळाली; पण मायेची नाहीं. कशी मिळेल? अन् लाडीनें तरी तशी अपेक्षा कां करावी? पण लाडी अजाण होती. तिला वाटत होतें, कीं आपली मेलेली 'बा' सणावारीं तरी सावकारणीच्या काळजांत दिसावी. धनी अन् धनीण या दोघांच्या कात्रींत पांच वर्षें तिनें काढलीं. तिला रडूं येत होतें; पण रडायचें कोणापुढें? पण त्यानंतर ती जागा तिला उमेच्या रूपानें मिळाली.

वरातीच्या घोड्यावरून उतरून उमा जेव्हां तोरणाखालीं उभी राहिली तेव्हां तिच्या पायावर पाणी घालायला लाडीच पुढें झाली होती. दिव्याच्या मंद प्रकाशांत ती सुवेष, सालंकृत प्रतिमा लाडीला मोठी गोड वाटली. लाडी चौदा वर्षांची तर उमा तिच्याहून दोन तीन वर्षांनीं लहान होती. तारुण्य कुठलें; मुग्धत्वसुद्धां अजून तिला शिवलें नव्हतें. त्या दोघी जेव्हां अमोरासमोर झाल्या तेव्हां उमेच्या काळयाभोर चंचल डोळ्यांनीं लाडीवर

झेप घातली आणि तिनेंहि ती आपल्या अंतःकरणाच्या ओंजळींत झेलून घेतली. जन्मांतरींच्या सखी-पार्वती जणूं दैवी संकेतानें एकत्र जुळल्या. लाडी तिला अधिक न्याहाळूं लागली. तिच्या पायांतले तोडे, परवंट्यावरून आवळलेला सोनेरी पट्टा, गळ्यांतल्या होना-पुतळ्यांच्या गळेसऱ्या, हातांतल्या तोडे-पाटल्या, कानांतले मोत्यांचे लोंबते घोस, वेणीच्या शेपट्यावर आमूलाग्र जडवलेलीं फिरकीचीं सुवर्णफुलें--उमा एका मातब्बर सावकाराची सून होऊन आली होती. पण लाडीला वाटलें, हे सगळे अलंकार भराभर उपसून फेकून द्यावे आणि तिला आपल्यासारखीच मोकळी करून हृदयाशीं कवटाळावी.

नव्याचे नऊ दिवस संपले आणि मग उमेलाहि वाटूं लागलें, कीं जाच करून घेण्याच्या दृष्टीनें, वर्माशर्माचीं बोलणीं सोसण्याच्या दृष्टीनें लाडी अन् आपण एकाच पायरीवरच्या आहों. त्यामुळें उमा लाडीला अधिक जवळ झाली. दोघींचें रहस्य कुजबुजूं लागलें. लाडी उमेची खरीखुरी पाठराखीण बनली. उमेच्या चुका स्वतःच्या माथीं घेऊन सासूच्या शब्दांतलें हालाहल पिऊं लागली. लाडीला आईच नव्हती. उमेला होती; पण ती दोन कोस लांब होती. मिळून, दोघी आईवेगळ्याच पडल्या होत्या. लाडीला नव्हती ती एक वस्तु उमेला होती, ती म्हणजे नवरा. पण त्याच्याशीं जीवभाव जडवायला, तिथून सहानुभूतीचा झरा मिळवायला अजून चार वर्षें तरी जायला हवीं होतीं. आजमितीस तोहि त्या घरांतलें एक 'लेंकरूं'च होता. तिला वर्षें अकरा तर त्याला जेमतेम पंधरा. उमाच त्याला बिचकत होती असें नव्हे, तर तोहि तिला बुजत होता. लाडी तिला कधीं तरी चिडवण्याच्या उद्देशानें म्हणे, 'असा काय ग तुझा हा दादला! तूं समोर दिसलीस की तोंड काय लपवतो?'

त्यावर उमा जवळचें एखादें पोफळ अथवा मातीचें लहानसें डिखळ उचलून लाडीच्या अंगावर फेकी आणि फुरंगटल्यासारखें करी. पण लाडी तेवढ्यानें दबत नसे.

"...नाहीं तर माझा पुन्या बघ! इकडे यायचा झाला कीं पाटाच्या वळणावरच्या खयटीच्या झाडापासून शीळ घालीत येतो. आखाड्यापासल्या

आंब्यामागं उभा राहून मी कुणीकडे आहें तें निरखतो. तिथूनच एक दगड सुं ऽ ऽ य् दिशीं भिरकावतो. दगड डाव्या अंगाला गेला कीं मियां समजायचं, कीं वहाळापलीकडच्या केतकीबनांत अन् उजव्या अंगाला गेला तर उमगायचं, कीं माळावरच्या पिंपळपाराच्या आडोशाला. मी समोर उभी राहिलें कीं मला नुसता डोळ्यांत भरून घेतो. माझा प्राण कसा 'फुक् फुक्' उडायला लागतो. मी मग धीर करून त्याला म्हणतें, 'मला जवळ करायचं असलं तर खांद्यावरची बंदूक दूर ठेव आधीं. जसं कांहीं तिच्यासंगं तुझं लगीनंच लागलं आहे ...'

लाडी अशा रीतीनें रंगांत आली कीं उमा तिला मध्येंच थांबवून म्हणे.

"लाडल्ये ! आतांशा तुझं हें पुन्याप्रकरण फार वाढलं आहे बरं का ! मामंजींच्या लक्षांत आलं तर पाठीला विऱ्या बांधाव्या लागतील; मग बसशील मुसमुस करीत."

"म्हंजी तुला तेवढा घोव हवा अन् मला नको असंच ना ?"

"असं कसं ? मुलगी म्हटली कीं तिला नवरा हवाच. पण त्यासाठीं एवढं गुडघ्याला बाशिंग बांधूं नको ! मामंजी एखाद्या गांवकाराचा, रुप्याचं 'कांड' कमरेंत घालणारा मुलगा बघतील तुझ्यासाठीं."

"तुझ्या मामंजीचं पुरे झालं !"

आणि मग लाडी फणकाऱ्यानं तिथून उठे आणि घसाघसा पोफळींना शिंपणें घालूं लागे.

लाडीचे हे प्रणयाचे खेळ फार दिवस गुप्त राहूं शकले नाहींत. शाबा सावकाराला एक दिवस या प्रकरणाचा वास लागला आणि पाळत राखून त्यानें दोघांना एकत्र पकडलें.

"पुन्या, आजचा दिवस तुझी गय करतों. पुन्हा या बाजूला फिरकलास तर रेजिदोराकडे नेऊन तुझीं सालडीं काढीन ! फार दिवस तुझ्या गमजा पाहतोंय. काम नको, धाम नको; टाकली बंदूक खांद्यावर कीं चालला उंडारायला. गांवांतल्या पोरी फुस लावून झाल्या. आतां लाडीच्या मागें लागलास ! पण लाडी या शाबा सावकाराच्या घरची पोरगी आहे हें लक्षांत ठेव..."

सावकार त्याला आणखी काय काय बोलला अन् पुन्यानें त्याला काय जाबसाल दिला तें ऐकायला लाडी तिथें थांबली नाहीं. तिनें हरिणाच्या गतीनें घर गांठलें आणि परसदारची ओटी धरली. तिचें उडतें काळीज स्वस्थ व्हायच्या आंतच शाबा सावकार तिथें आला आणि त्यानें हातांतल्या फोकानें तिच्या तुकतुकीत घाटदार पोठऱ्यांवर चार-पांच वळ उठवले.

वळ उठले, दबले अन् थोड्या दिवसांनीं मावळले. मावळली नाहीं ती अंतरांतली प्रेमज्योत. ती तेवतच राहिली. योग्य संधीची वाट पहातच राहिली. पण त्यानंतर तिच्याभोंवतीं तारांचें कुंपण पडलें. सावकार, त्याची बायको अन् भरीला उमेचा नवरा यांचे सहा डोळे तिच्यावर पहारा करूं लागले. लाडी घरांतून निघून जाणें म्हणजे सावकारपत्नीचा हात मोडण्यासारखें होतें. त्यांतहि पुन्याशीं तिचें सूत जमणें हा सावकाराचा धडधडीत अपमान होता. पुन्याविषयीं त्याचें मन चांगलें नव्हतें. सावकार वाड्यावर गेला कीं, सगळे कुळवाडी गोगलगाय बनत. खालच्या मानेनें त्याचे हुकूम ऐकत. पुन्याच एकटा त्याच्या डोळ्याला डोळा भिडवीत असे. पुन्याचा बाप त्याचें कांहीं देणें लागत होता; पण पुन्यानें त्याबद्दल सरळ आपल्या कांखा वर केल्या 'बापाला जन्मभर राबवून घेतलास तेवढ्यानं देणं फिटलं नसलं, तर स्वर्गात जाऊन वसूल कर!' असें लोकांच्याकडे बोलून त्यानें तें सावकाराच्या कानापर्यंत पोंचवलें होतें त्या उत्तरावर सावकाराला हात चोळीत बसणें भाग पडलें होतें. 'नंगेको खुदा भी डरता है' अशांतलाच तो प्रकार होता. आणि म्हणूनच पुन्यापेक्षां तो लाडीलाच अधिक जपत होता.

या जपणुकींत कांहीं महिने गेले. सावकाराला दोघांचीहि कांहीं आगळीक दिसली नाहीं. पुन्या वचकला अशी त्याची खात्री झाली. आपल्या हातचा 'प्रसाद' लाडीलाहि पुरला असें त्याला वाटलें. पण या आत्मगौरवाच्या स्वप्नांतून सावकाराला एक दिवस खडबडून जागें व्हावें लागलें. वैशाखांतल्या एका संध्याकाळीं गुरें वळवून आणायला म्हणून लाडी जी घरांतून गेली ती परत आलीच नाहीं. शाबा सावकाराचें काळीज धसकलें. लाडीच्या काळजीनें नव्हे; तर पुन्या आपल्या नाकाला चुना लावणार

म्हणून ! त्यानें घरांत प्रत्येकाला लाडीबद्दल विचारलें पण सगळीं माणसें भाबडा चेहरा करून आपल्याला कांहीं ठाऊक नसल्याचें सांगत होतीं. या सगळ्यांत जाणकार होती ती फक्त उमा. पण ती अजाणतेपणाचें घुंगट घेऊन बसली होती. तिला लाडीचा विश्वासघात करायचा नव्हता.

त्याच दिवशीं तिसरा प्रहर संपायच्या वेताला उमा वहाळाजवळ भिरंडें गोळा करीत होती. पलीकडे पश्चिमेला वृक्षांची तटबंदी उभी होती. तिच्या खिंडारांतून सूर्यकिरण कुळागरांत घुसून पोफळींच्या झुबक्यांवर पडत होते. ज्या भिरंडीच्या खालीं उमा होती तिथें जवळच तगरीच्चीं दोन झांकरें दुधासारख्या शुभ्र फुलांनीं वांकून आलीं होतीं. त्यांच्या पलीकडे हाताच्या अंतरावर दोन कुळागरांमधल्या सीमेचे दुर्ग होते. त्याच्या दुसऱ्या अंगाच्या अननशींनीं आपल्या लांब काटेरी पात्या उंचावून दुर्गाच्या डोक्यावर टाकल्या होत्या. धडेखालीं वहाळाचें पाणी झुळझुळत होतें. वाऱ्यानें आजूबाजूच्या केळींचीं सोपें आवाज न करतां डोलत होतीं. अशा त्या मनोहर एकान्तांत उमेची तंद्री लागली होती.

एवढ्यांत त्याच तगरींच्या मागून उमेला 'शुक् शुक्' असा आवाज ऐकूं आला होता. दोन फांद्यांच्या पुष्पसंभारामधून लाडीच्या मुखाचें नीलकमल तिला दिसलें होतें. हातांतलीं भिरंडें पाटींत टाकून उमा तिच्याजवळ गेली होती लाडीनें क्षणभर तिच्याकडे स्थिर दृष्टीनें पाहून हलक्या आवाजांत म्हटलें होतें.

"उमाबाय, मी चालल्यें."

"चाललीस ?...कुठें ?"

"माझं लगीन ठरलं आहे."

"कधीं ? अन् कुणाशीं ?"

"दुसऱ्या कुणाशीं ?"

"म्हणजे ! शेवटीं तूं पुन्याच्याच जाळ्यांत अडकलीस का ?"

"असं बोलूं नको उमा. माझ्या जिवाला झोंबतं तें. माझा पुन्या उमदा झिलगा आहे. माझ्यावर खूऽप खूऽऽप जीव आहे त्याचा. माझ्या-बिगर नाहीं जमायचं त्याचं. दिंड्याची राई ठाऊक आहे तुला ? इथून दोन कोस आहे म्हणे. तिथें आमचं उद्यां लगीन होणार आहे."

" बरं बाई ! देव तुझं भलं करो ! "

पुन्हा तिनें उमेकडे टक लावली. पुढें काय बोलावें तें तिला क्षण-भर सुचेना.

" उमा-- "

" काय लाडे ? "

" आतां तुझं एकटीचं कसं होईल ग या घरांत ? तुझी सासू ही अशी अन् नवरा अजून घुम्या- "

त्यावर उमेचे डोळे झरकन् भरून आले. लाडीनें तिच्या खांद्यावर आपला भावनांनीं जड जड झालेला हात ठेवला अन् म्हटलें.

" मला विसरूं नको हं ! नाहीं ना विसरणार ? तुझ्यासाठीं आंतडं तुटतंय् माझं. तूं एकटीनंच मला या घरांत सुख दिलंस. मी एक अनाथ पोर. तुमच्या घरांतली केरसुणी. पण तूं माझ्या थोरल्या भैणीगत वागलीस. तूं यायच्या आधीं...पण जाऊं दे तें. मी आतां माझा सवताचा संसार मांडणार आहे. माझ्या पुन्यानं अवंदा डोंगर तोडला आहे. आम्ही तिथें आतां नाचणा पेरणार आहों. डोंगरावरच खोपट बांधणार आहों. सभोंवतीं तवशीं, चिबडं पिकवणार आहों. रोजिणी फुलवणार आहों. आमचं काय काय ठरलंय्... "

उमा ऐकत होती. ऐकतां ऐकतां गंगा-यमुना वाहवीत होती. लाडीच्याहि डोळ्यांतून रसधारा सुरू झाल्या होत्या. तिला पुढचें सोडवत नव्हतें, मागचें तोडवत नव्हतें. एक उमललेलें कृष्णकमळ अन् एक उमलण्याच्या मार्गावर असलेली आरक्त गुलाबकळी या दोघांची गळांमिठी पडली होती. सागरांत जीवन ओतायला धांवणाऱ्या नदीला उमा अडवूं शकत नव्हती तिला तशी दुष्ट इच्छाहि नव्हती. तिनें लाडीला दाटल्या गळ्यानें निरोप दिला होता. ती कापराच्या वडीसारखी कोणाला कळूं न देतां निसटून गेली होती. तिचें हें गुपित उमेनें सात आवरणांखालीं झांकून ठेवलें होतें. प्राण गेला तरी त्या बाबतींत ती आपले ओठ उघडणार नव्हती.

तिनेंहि जेव्हां 'आपल्या कानीं सात बाळ्या' म्हटलें तेव्हां शाबा सावकार अस्वस्थ झाला. त्यानें घरांतल्या मंडळींच्या वेंधळेपणावर यथेच्छ

तोंडसुख घेतलें. अंधारी रात्र होती तरी तसाच उठून तो वाड्यावर गेला. आपल्या विश्वासांतले चार गुप्त हेर त्यानें पुन्याच्या मागावर सोडले. रात्रभर तो अंथरुणांत तळमळला. सकाळीं पांखरं घरट्यांतून बाहेर निघायच्या आंत एक हेर येऊन त्याच्या कानाशीं लागला. त्याच्या बारीक डोळ्यांत विषारी झळक उमटली. त्यानें कपडे घातले. धडेजवळचीं झाडावर पिकलेलीं दोन मोठीं अननसें गड्याला तोडून आणायला सांगितलीं. त्यांच्या जोडीला दोन ताजीं शहाळीं पण पाटींत टाकलीं. तें ओझें त्याच हेराच्या डोक्यावर चढवलें. ते दोघे सरकारी मेटाची वाट चालूं लागले. रेजिदोर त्याचा दोस्त होता. त्याच्या मुखलेपाला लालचावलेला होता. त्यानं सावकाराचें स्वागत केलें. सावकारानें आपली फिर्याद गुदरली. रेजिदोराच्या अंगांत शासन-देवता संचरली. त्याच्या मडमेनें पण त्याला उत्तेजन दिलें. शिपायांना हुकूम सुटले. त्यांनीं दिंड्याच्या राईकडे मोर्चा वळवला आणि त्यानंतर तीन तासांनीं पुन्या, लाडी, पुन्याचे कांहीं दोस्त अन् भटजी एवढें लटांबर मेटावर आणून रेजिदोरापुढें उभें करण्यांत आलें. लग्न लागायच्या आधींच त्यांची ही अशी वरात काढण्यांत आली.

शाबा सावकाराला हर्षवायु होण्याची वेळ आली. त्यानें एक जळता कटाक्ष पुन्यावर टाकला. बेकायदा लग्न अन् अल्पवयी मुलीला पळविणें असे दोन आरोप रेजिदोरानें पुन्यावर ठेवले. पुन्यानें ते कबूल करण्या-ऐवजीं प्रतिवाद मांडला. रेजिदोराला तसलें कांहीं ऐकून घेण्याची संवय नव्हती. तो होता लष्करी माणूस. त्यानें त्याच क्षणीं पुन्याच्या श्रीमुखांत वाजवली. गोरा, धिप्पाड रेजिदोर अन् काळा, काटकुळा पुन्या. त्याला वाटलें होतें कीं, पुन्या पहिल्याच तडाख्याला कळवळेल, पायांशीं पडेल अन् गयावया करूं लागेल. पण तो डोंगरासारखा अविचल राहिला. त्यानें 'हायस्' सुद्धां केलें नाहीं.

रेजिदोराला तेंच अधिक दुखलें. त्यानें आणखी दोन-तीन वाजवल्या आणि तेवढ्यानें भागत नाहींसें पाहून टेबलावरची 'पाल्मतोरी' उचलली. त्या जाड लांकडी थापटण्यानें पुन्याच्या दोन्ही तळव्यांचे वडे फुगवले. काळीज दुभंगेल इतक्या जोराचा लाडीला हुंदका फुटला. तिची कोवळी काया

आपादमस्तक गदगदली. दुसरा स्फुंद उसळायला नको म्हणून तिनें पदराचा बोळा दांतांखालीं दाबून गच्च धरला. प्रहार पुन्याच्या हातावर होत होते; पण त्यांची कळ भिनत होती लाडीच्या मेंदूंत ! हातांतून रक्त फुटलें, रेजिदोर मारून घामाघूम झाला, तरी पुन्या एकहि चीत्कार काढीना हें पाहून रेजिदोराची मडमहि त्याच्यावर बिथरली. फिरंगी भाषेंत ती त्याला शेलक्या शिव्या मोजूं लागली. याच वाहत्या गंगेंत आपणहि हात धुऊन घ्यावा म्हणून शाबा सावकारानेंहि आपल्या ठेवणींतली एक शिवी बाहेर काढली ' आवय ××× '

आणि त्यासरशीं एकदम देखावा पालटला. पुन्यानें वाघासारखें किरण साधून सावकारावर झडप घातली आणि आपल्या सुजलेल्या हातांनीं त्याचा गळा धरला. सगळीकडे अद्‌भुत पुंजाळलें. लाडीचे डोळे विस्फारले. काय घडत आहे तेंच कळूं नये इतका तिच्या वृत्तींना स्तंभ आला. ती जणूं पाषाणाची मूर्त बनली. चार शिपाई धांवले आणि त्यांनीं सावकाराचा गळा सोडवला. त्याच्या निबर देहांतलें रक्त थिजलें होतें तें खेळूं लागायला कांहीं क्षण जावे लागले. घामाच्या धारा उपरण्यानें पुशीत, टिपित त्यानें भिंतीचा आधार घेतला.

पुन्यावर रीतसर खटला भरण्यासाठीं रेजिदोरानें त्याला डिचोलीला पाठवायची तयारी चालवली अन् सावकाराला घरीं जाण्याची परवानगी दिली. ' पुन्हां पळून-बिळून गेलीस तर तुझीसुद्धां चामडी लोंबवीन ! ' म्हणून तो अंमलदार जेव्हां लाडीवर गुरगुरला तेव्हां त्या अश्राप पोरीच्या पायांखालची जमीन हादरली. तिला पुढें घालून सावकार घरीं परतला. त्याच्या हातांत फक्त विजयाचा झेंडा तेवढा नव्हता. बाकी त्याचे सर्व मनोरथ पुरले होते. एवढा वेळ शिक्षा झाली होती ती एकतर्फी. दुसरी बाजू अजून अक्षत, अविद्ध होती. सावकारानें तें शिक्षासत्र आपण पुढें चालवायचें ठरविलें. मारीत झोडपीत त्यानें लाडीला घरीं आणलें. मनाचें खंबीरपण अन् गात्रांचें त्राण हरपून जिवाच्या आकांताला ती अंगणाच्या मेरेजवळच्या शिळेवर पासली पडली तरीहि तिच्या उघड्या जांघांवर आणखी दोन छड्या त्यानें वाजवल्याच. ' निर्लज्ज, अधम कार्टी ! ज्यानं पाळलं, पोसलं त्यालाच नागीण होऊन डसायला निघाली ! '

भरल्या ताटावरून लाडीला ओढून काढण्यांत आलें याबद्दल त्या घरांत कोणाला काकळूत वाटली असेल तर ती उमेला. पण तिला लाडीच्या दु:खावर प्रकटपणें फुंकर घालणें शक्य नव्हतें. कारण, लाडी त्या घरची गुन्हेगार होती. ती एकटी निवांत कुठें अन् कधीं भेटेल याची उमा वाट पहात होती. पण तशी संधि जेव्हां आली तेव्हां लाडीनेंच तिचा हात झिडकारला. तिचा उमेवर डंख होता. तिच्या मतें तिनेंच विश्वासघात केला होता. उमेला त्या आरोपानें काळीज कुरतडल्यासारखें झालें. आई-वडिलांचीच नव्हे, तर खुद्द आपल्या कुंकवाची जेव्हां तिनें शपथ वाहिली तेव्हां कुठें लाडीचा संदेह फिटला. उमा आपल्यासाठीं दु:खीकष्टी झाली आहे हें पाहून लाडीला त्यांतल्या त्यांत सुख वाटलें.

पुढें कांहीं दिवसांनीं पुन्याला तीन महिने शिक्षा झाल्याचें तिनें घरांतच ऐकलें. पण तीन महिन्यांनंतर तरी काय? तिची आशाच आतां जीव धरीना. इथेंच—याच घरांत आपण कुजत मरणार ही एकच खंत तिचे पंचप्राण घेरून राहिली.

पुढें उन्हाळा संपून पावसाळा आला. त्याला खो देऊन शरदानें आपलें राज्य विस्तारलें. शेतांतल्या भाताच्या पाठोपाठ कुळागरांतली सुपारीहि पिकली. हंगाम डोक्यावर आला. पण याच वेळीं एक अशुभ वार्ता वातावरणांत ‘घूं घूं’ करूं लागली. ठिकाणदारांचीं मनें धसकलीं. दोन ठिकाणदार एकत्र झाले कीं त्याच बातमीवर कुजबुजूं लागत.

“राण्यांनीं पोर्तुगीज सरकारच्या विरुद्ध बंड सुरू केलं म्हणे! साटरें-गडाच्या बाजूनं एक-दोन चकमकीसुद्धां झाल्या असं ऐकतों. आतां कसं रे?”

“हरीची इच्छा! शक्य तितक्या घाईनं पीक पदरांत पाडून घ्यायचं. शक्य तोंवर मान चेपून राहायचं. उपद्रव वाढलाच तर माणसं घाटमाथ्या-वर पोंचवायचीं हें शेवटीं आहेच.”

पण त्या बाजूला विशेष कोणाचें लक्ष गेलें नाहीं. बंडवाल्यांच्या नांवाखालीं कधीं कधीं भुरटे चोर येत, धमक्या घालीत; पण शेर-अच्छेर तांदूळ अन् एखाददुसरा नारळ तोंडावर टाकला कीं निघून जात. बातम्या मात्र रोजच्या रोज नव्या उठत. ‘कुडसेकरानं आपला जथा तयार केला’;

'पिसुर्लेकरानं आपली टोळी उभारली.' पण शाबा सावकाराचें धाबें दणाणलें तें पुन्याच्या बातमीनें. तुरुंगांतून सुटून आल्यावर तोहि बंडांत सामील झाला आहे अन् त्याच्या हाताखालीं पन्नास तरणे झिलगे जिवावर उदार होऊन एकत्र झाले आहेत, हें समजल्यापासून त्यानें हायच खाल्ली.

पण पुन्याहि कधीं त्या बाजूला फिरकला नाहीं. गांवकऱ्यांनीं सुपारी सोलून वाण्याच्या पदरांत घातली. धीर करून वायंगणेंहि पेरलीं. भीत भीत का होईना; पण गांवकऱ्यांनीं सगळे व्यवहार सुरू ठेवले. तशांतच एक दिवस शाबा सावकाराच्या माजघरांत उमेसाठीं मखर घालावें लागलें. 'मुका नातू' झाल्याबद्दल सावकारपत्नीनें घरोघर साखरेच्या पुड्या लाडीच्या हातीं पाठवल्या. रोज तिसऱ्या प्रहरीं उमेला गांवांतून 'वाढलीं' येऊं लागलीं. लाडी तिच्या दिमतीला आली. उमेची थट्टा करायला तिला सुंदर विषय मिळाला. सातव्या दिवशीं फलशोभनाचा मुहूर्त ठरला. लाडीचें उदास, अंधारलेलें जीवन उमेच्या आनंदानें कांहीं काळ उजळलें. ती रोज निरनिराळ्या फुलांच्या वेण्या करून तिला माळूं लागली. तिच्या प्रसाधनांत जणूं ती स्वतःचेच सोहळे, उपभोगूं लागली. तिच्या विकसित यौवनावर, आरक्त लावण्यावर शृंगारसाज चढला कीं, 'बघूं दे माझ्या बाईचं तोंड' म्हणून लाडी तिची हनुवटी धरून ठेवी आणि आपल्या नेत्रांचीं निरांजनें तिला ओवाळी. तिच्या डोळ्याला डोळा भिडवतांना उमेचा जीव लाजून चूर होई. उमा आतां शृंगार-वनांतली माधवी होणार, वल्लभाच्या स्पर्शानें कळ्या-फुलांनीं बहरणार, न सांगतां येण्याजोगें आगळें सुख अनुभवणार, याचा आनंद उमेपेक्षां लाडीलाच अधिक झाला.

संस्काराच्या दिवशीं उमा नवऱ्याच्या शेजारीं अग्नीसमोर बसली. सुस्नात, सालंकृत होऊन अन् ओल्या केसांचा सैलसर आंबाडा मानेवर रुळता सोडून. धुरानें तिचे डोळे भरले, खळखळले अन् लाल लाल झाले. लाडीनें दुरून हसत हसत नाकासमोर तर्जनी हालवली आणि आपला अभिप्राय दर्शविला. 'बरं झालं. असंच पाहिजे.' आज उमेला इतर सुवासिनींनीं वेढलें होतें आणि लाडीला तिच्यापासून दूर रहावें लागलें होतें. पण त्याचा तिला विषाद वाटला नाहीं. उमेच्या वांट्याला दिवस

खूप रेंगाळला अन् अखेर एकदाचा संपला. रात्रीं सासूनें उमेच्या ओटी-भरणाची तयारी मांडली. त्याआधीं उमेकडून नवऱ्याचे पूजोपचार व्हायचे होते. शेजारच्या चार बायका उमेदीनें त्यासाठीं जमल्या होत्या आणि तिला शिकवीत होत्या–'आतां आधीं पाय धुवायचे. उठून उभी राहा. भरला कलश हातांत घे अन् उखाणा घेऊन पाय माग.' उमा उभी राहिली. थोडा वेळ मान वळवून लाजली. लाडी त्या बाजूला होतीच खूण करायला. 'आटप लवकर!' तिनें उखाणा ऐकण्यासाठीं जिवाचे कान केले. उमेचीं ओष्ठदळें उघडलीं–

'रुप्याच्या वाटींत दुधाचा खवा
श्रीपतराव, पाय द्या डावा'

सभोंवतीं स्मिताची एक लकेर उजळली अठरा वर्षें नुकतींच पुरीं झालेल्या, अजून मिसरुडीचाहि पत्ता नसलेल्या त्या पोरसवदा नवरदेवानें आंबुरखें हसून डावा पाय पुढें केला. उमेनें डाव्या हातानें तो हळुवारपणें धरून उजव्या हातानें कलशांतलें पाणी त्यावर धार धरून ओतलें. उमेच्या स्पर्शसुखाची ती नांदी होती. पण ती बऱ्या मुहूर्तावर झाली नव्हती.

पांच-पंचवीस काळ्या जवानांनीं त्याच क्षणीं शाबा सावकाराच्या घराला वेढा दिला. त्यांतले कांहीं अंगणांत राहिले; कांहीं घरांत घुसले. बाहेरच्यांनीं सावकार पडवीवर बसला होता त्याच्या मुसक्या आवळून तोंडांत बोळा कोंबला. घरांतल्यांनीं दिवे फुंकरून उमेच्या तोंडावर हात ठेवला अन् तिला उचललें. बायका गर्भगळित झाल्या. त्यांच्या जिभा टाळूला चिकटल्या. तें अठरा वर्षांचें, उमेचा नवरा झालेलें पोर उठलें अन् मट्टदिशी बसलें. क्षणापूर्वीं जिथें वात्सल्य अन् कौतुक विराजत होतें तिथें आतां महान् प्राणभय मांडलें कोण दडलें अन् कोण कुठून पसार झालें त्याचा पत्ता लागेना. बंडवाल्यांनीं कांहीं लुटलें नाहीं. कोणाला इजाहि केली नाहीं. नेमलेल्या कामावर अन् ठरलेल्या लक्ष्यावरच फक्त झडप घातली. आले, आले अन् दोन व्यक्तींना उचलून पसार झाले एक सावकार अन् दुसरी उमा.

वरची डोंगरघाटी चढून ते दुसऱ्या पालथणाला उतरले. रात्र अंधारी,

वाट बेतासबातच; पण ते कुठें थबकले नाहींत, कुठें अडखळले नाहींत. घाटीच्या मुळसांत, दाट जंगलाच्या पोटांत, मनुष्यवस्तीला अगम्य अशा एका जागीं ते येऊन थबकले. त्यांची चाहूल लागतांच एका व्यक्तीनें वजनदार आवाजांत विचारलें.

" काम फत्ते ? "

" जी हय् ! "

" चुडण्या पेटवा. मला एकदां बघूं दे. "

बोंडगीच्या दांड्यांच्या चुडण्या भरभर पेटूं लागल्या. त्या लकाकत्या उग्र प्रकाशांत शाबा सावकारानें आपल्या वैऱ्याला पाहिलें अन् डोळे मिटून घेतले. आतां रेजिदोर त्याच्या कामाचा नव्हता. काळ बंडाचा होता. सरकारी अंमल उखडला होता. राज्ययंत्राच्या नाड्या ठायीं ठायीं तुटल्या होत्या सावकाराला वाटलें, कीं आज आपलीं शंभर वर्षें भरलीं.

पुन्या एका आडव्या बुंध्यावर बसला होता. त्याची अर्धांगी–ती बंदूक शेजारीं टेकलेली होती. तिच्या नळीवर चांदीच्या पट्ट्या शोभत होत्या. दारूगोळ्याचं तोस्तान तिथेंच अर्धवट उघडें पडलें होतें. पूर्वींचा तिबोटी लंगोटीवाला पुन्या आतां कवतकाठी धोतरांत होता. त्याच्या अंगांतला कोटहि भारीपैकीं होता. त्याचा जरीचा हिरवा रुमाल बुंध्यावरच लोंबकळत होता. काळ्या फाटक्या कांबळीच्या जागीं आतां लोंकरीची शाल आली होती. पुन्या कोण्या मातबराला लुटून श्रीमंत झाला होता, सरदार झाला होता. ते सगळे जवान त्याचे शिलेदार होते. त्याच्या जिवावर चैन करीत होते अन् धुमाकूळ घालीत होते. पुन्यानें त्यांना दुसरा हुकूम फर्मावला, ' सावकाराला या समोरच्या झाडाशीं बांधून घाला. '

पांच मिनिटांत सावकार जखडबंद झाला. उमेला त्यानें बांधलें नाहीं. तिला तसेंच एका दांडगटाला धरून ठेवायला सांगितलें. उमेची आजची ' पहिली रात्र.' तिच्यासाठीं एकान्तशय्या लाडीनें सजवून ठेवलेली होती. तांबूलसाहित्याचा चौफुला तिथें भरून ठेवलेला होता. वेलची-साखर घातलेल्या दुधाचें फुलपात्र भरलेलें होतें. पण तिच्या वांट्याला आज ते भोग नव्हते; हे होते. तो करपाश नव्हता, हा गळफास होता. तो अमृता-

भिषेक नव्हता, ही अंगारवृष्टि होती. पुन्यानें एकवार तिच्याकडे कटाक्ष फेकला. दांतांच्या धारेखालीं आपला अधर दाबून आणि वेलीचा एक लांब, चिवट तुकडा हातांत उचलून तो सावकाराकडे वळला.

" काय सावकारा ! वळखलंय माकां ? "

त्या सवालाचा रोखच असा भेदक होता, कीं त्याच क्षणीं शाब्रा सावकार चळचळला. ' बोल कीं, दांतखिळी कां बसली ? ' म्हणून पुन्यानें त्याच्या दोन्ही पोटऱ्यांवर वेलीची वादी सपकन् उठवली.

" देवा रे ऽऽ ! मेलोंऽऽ ! नको रे मारूं ! पायां पडतों तुझ्या— "

" असं विवळायचं नाहीं. रेजिदोरानं माझ्या या दोन्ही तळव्यांतून रक्ताच्या पिचकाऱ्या उडवल्या तेव्हां मी विवळलों होतों ? हायस तरी केलं होतं ? " पुन्यानें आणखी एक तसाच जबरदस्त फटका ओढून विचारलें.

" नको ..नको...अयाई ऽऽऽ ? "

पण सावकाराच्या या आर्त चीत्काराकडे लक्ष न देतां तो आपल्या शिलेदारांकडे वळून बोलूं लागला.

" गड्या हो ! हा जांभळी गांवचा सावकार. फार फार भला माणूस. रामपारीं उठून देवाचं नांव न घेतां याचं घ्यावं. याच्या घरीं लाडी नांवाची एक अनाथ पोरगी आहे— "

आणि त्यानें तो सगळा पुढचा वृत्तान्त त्यांना निवेदिला. तेहि तापले, खवळले. सावकाराला मारायला फुरफुरले पण पुन्यानें त्यांना दटावून मागें सारलें. तो त्यांना म्हणाला.

" आतां तुम्ही सगळे इथून दूर व्हा. खालच्या वहाळाच्या काठीं माझी हाक ऐकूं येईल इतक्या बेतानं बसा. पुढचा कार्यभाग माझा एकट्याचा आहे. "

त्यांनीं ' जी ' म्हटलें आणि तोंडें वळवलीं. उमेचें मनगट स्वतःच्या हातीं घेऊन त्यानें त्या गड्यालाहि मुक्त केलें. ते चार झाडांच्या आड झालेले पहातांच पुन्या सावकाराच्या पुढें उभा राहिला.

" सावकारड्या ! उघड डोळे आतां. ही तुझी सून. आज हिचं ' फळशोभन ' होतं, खरं ना ? पण तुझ्या शेंबड्या पोराचं तें काम नव्हे.

तो अधिकार आज या पुन्याकडे आहे. बंड उद्‌भवलं नसतं तर हा मोका मला मिळाला नसता. मीं कदाचित् खून केला असता, पण हें काम त्याहून नामी झालं. तुलाच नव्हे, तुझ्या कुळाला मी आज कलंक लावणार आहे. मरेपर्यंत तुझं काळं तोंड अंधारांत खुपसलेलं राहील असं करणार आहें. माझं बाशिंग तोडतांना बरं वाटलं, होय ना ? आतां त्या कर्माचं फळ बघायला डोळे उघडे ठेव. ”

आणि त्यानें उमेची चोळी तिच्या हृदयाशीं हाताचीं बोटें खुपसून टर्‌रदिशीं फाडली. उमेला वाघशिरें पडलें. ती भयाच्या आणि कोणत्याहि जाणिवेच्या पलीकडे गेली. उमा म्हणजे एक मातीचा गोळा बनली. पुन्या तिला डाव्या भुजाचा विळखा घालून जवळ करायला निघाला मात्र; त्याच क्षणीं पाठीमागची जाळी खजबजली आणि लाडीची झेप पुन्याच्या अंगावर पडली. आतां स्तंभित होण्याची पाळी पुन्यावर आली. साहजिकच उमेला जवळ ओढणारा त्याचा भुजदंड सैल पडला. लाडीनें त्याचे दोन्ही हात कवेंत धरून त्यांच्यासकट त्याच्या काळजाला मिठी घातली.

“ उमा ! पळ. वरच्या रानांत उडी घे. वाट फुटेल तिकडे धांव. पडलीस, आदळलीस, मेलीस तरी चालेल. पळ, पळ– ”

दुसऱ्याच क्षणाला उमा तिथून अदृश्य झाली. पुन्या बेभान झाला, शिव्या देऊं लागला, लाडीचा विळखा सोडवण्याचा आटापिटा करूं लागला. पण कड्याला घोरपड चिकटावी तशी लाडी त्याला चिकटली होती. तिची ती मिठी म्हणजे ‘ मढेमिठी ’ होती. त्याला हात वर उचलतां येत नव्हते, म्हणून त्यानें खालून तिच्या मांड्यांना पिळाचे चिमटे घ्यायला सुरुवात केली.

“ सोड. मिठी सोड आधीं. या वेळीं मला तूं नकोस. ती पाहिजे. सावकाराची सून पाहिजे. तिचा बळी घ्यायचा आहे मला ! ”

“ तें नाय् मी तुला करूं देणार. ”

“ नाहीं ? तूं कोण गो रांडला ! तुझा मुडदा पाडीन, खबर नाहीं ! ”

अखेर त्यानें आपला एक पाय वर घेऊन लाडीच्या पोटकुळाला लावला आणि नेटानें तिला दूर लोटलें. शारीरिक युद्धांत पुरुषापुढें स्त्रीचा पराभव झाला. ती दाणकन् दगडाधोंड्यांत उताणी आदळली. अन् पुढें ?—

पण पुढें काय तें रात्रीच्या भयाण काळोखांत कसें दिसणार ? त्यासाठीं दिशा उजळायला हव्या. उमेचाहि उजाडेपर्यंत पत्ता लागायचा नाहीं. ती बहुधा घरीं पोंचली नाहीं. कुठल्या तरी अडुळशाच्या अथवा कारवीच्या जाळींत ती जिवाची मोटळी करून बसली असेल. सासऱ्याची नव्हे; तर लाडीची चिंतवणी करीत असेल. अभयासाठीं नवऱ्याच्या नव्हे, तर लाडीच्याच कुशींत रिगण्याची उत्कंठा धरीत असेल.

पहांटे कधीं तरी लाडी सावध झाली. उठून घरच्या वाटेला लागली. लंगडत, कण्हत, धापावत. कसें तरी तिला घर गाठायचें होतें. तिचें वाटोळें तोंड सुजून मडकें झालें होतें. दांतांओठांतून निघालेलें रक्त हनुवटी-वर वाळलें होतें. आंगभर वेलीच्या माराचे वळ उठले होते. लाथा-बुक्क्यांनीं हाडन् हाड दुखावलें होतें. आणि या सर्वांत नितान्त करुण गोष्ट म्हणजे तिचें अंतर्याम डागळलें होतें. तिनें जीवनाचा आधार, प्रेमाचा पंढरिनाथ मानलेला पुन्या आतां तिचा राहिला नव्हता !

उमेनें तिला येतांना पाहिलें. तिचा साकळलेला, आक्रसलेला जीव एकदम फुलून आला. ती लपलेल्या जागेवरून उठून वाटेवर आली आणि ‘ माझी जन्मांतरींची मायमाउली ’ म्हणून धांवत पुढें जाऊन लाडीला बिलगली.



# तीन मुलांची आई

आपल्या आयुष्यात आजचा हतभागी दिवस उजाडणार अशी घारी-मावशीला अंधुक जरी कल्पना असती, तरी लग्नाच्या वेळीं, ‘ अष्टपुत्रा सौभाग्यवती भव ’ हा आशीर्वाद देणाऱ्या ब्राह्मणांना तिनं डोळ्यांत पाणी आणून विनवलं असतं.

“ नको. हा आशीर्वाद परत घ्या. मला आठ पुत्र नकोत, पांच नकोत तीनहि नकोत, फक्त एकच पुरे आहे मात्र तो कुलदीपक असावा. मायाळू असावा. वृद्धपणीं आपली उपेक्षा करणार नाहीं असा असावा. मरतेवेळीं आपल्याला समाधानानं प्राण सोडूं देईल असा असावा...”

आजच्या दिवसाचं गांभीर्यंच तसं होतं. तिचे तीन मुलगे आज घर फोडायला निघाले होते, वांटण्या करायला निघाले होते. गेलं वर्षभर त्या घरांत धुसफूस चालू होती. सुना एकमेकींवर ब्रिथरल्या होत्या. ‘ जावा जावा अन् उभा दावा ’ या म्हणीची प्रचीति त्यांनीं घारीमावशीला आणून दिली होती. त्या तर धुमसत होत्याच; शिवाय त्यांनीं वेगवेगळ्या निमित्तांनीं आपल्या पुरुषांच्या काळजांतहि ठिणगी पाडली होती. प्रथम त्या भावां-मधली खेळीमेळी ओसरली होती. नंतर संगत अन् पंगत तुटली होती. पुढें खटके सुरू झाले होते. एकमतानं संसारांतली कोणतीहि गोष्ट होण्याचं बंद झालं होतं. कोणालाच कोणाचा विश्वास उरला नव्हता आणि आज ते एकत्र बसले होते ते वांटण्या करून घेण्याच्या निर्धारानं.

घारीमावशीच्या मनावर गेले कित्येक महिने खूप ताण पडला होता. तिला अन्न गोड लागत नव्हतं अन् झोपहि सुखानं येत नव्हती. सून आणि मुलगे यांच्यांत तोंडातोंडी झाली नाहीं, काळजाला चावा घेणाऱ्या शब्दांची देवघेव झाली नाहीं, असा दिवसच जात नसे. घारीमावशी थोरल्याचा कड घ्यायला गेली कीं दुसरे दोघे तिच्यावर तुटून येत. धाकट्याचं बोलणं रास्त आहे म्हटलं तर थोरला तिला अक्कलशून्य म्हणे. सुना तर अलीकडे

'असिवार' सुटल्या होत्या. विशेषतः थोरल्या दोघीजणी. जोंवर मुलगे आईला 'आई' म्हणून ओळखीत होते तोंवर त्या जरा दबून होत्या. पण त्यांचं मातृप्रेम आटलं आहे हें जेव्हां त्यांच्या निदर्शनाला आलं, तेव्हां त्या आतां सासूच्या सासू बनल्या होत्या.

घारीमावशी हें सगळं सोशीत होती अन् पदोपदीं होणारा आपला अपमान विसरून आपल्या मुलांत 'भावकी' नांदावी म्हणून जिवाची शर्थ करीत होती. नको असूनहि प्रत्येकाला समजावायला जात होती. 'मी तर दुःखी कष्टी झालेंच आहें. पण तुमचे मेले गेले पूर्वजहि तुमच्या वर्तनानं दुःखं गाळतील' म्हणून त्यांच्या भावनेला कौल लावीत होती. परंतु हें सगळं चुलींत गेलं होतं. तिच्या डोळ्यांदेखत त्यांनीं पुढची पायरी गांठली होती. ते आतां कायमचे वेगळे अन् वैरी व्हायला निघाले होते. घारीमावशीनं आंतड्याला पीळ घालून त्यांना अखेरचं विनवलं.

"बाबांनो! माझे आतां 'दस गेले पांच उरले.' निदान माझ्या कुडींत प्राण असेतों तरी वेगळे होऊं नका."

नंतर समतोल वांटण्या होण्यासाठीं मुलांनीं बोलावून आणलेल्या पंचांना उद्देशून घारीमावशीनं पदर पसरला.

"तुम्हीं तरी यांना चार हिताचे शब्द सांगा. माझं घर फुटणं हें तुम्हांला तरी बरं वाटतं का? तुम्हीं वांटण्या करूं नका. माझ्या मुलांमधें कलि शिरला आहे तो दूर करा."

"हा कलि कुठून बाहेरून आला नाहीं. दादा हाच मूर्तिमंत कलि आहे या घरांत. दाखवतो मात्र धर्मराजाचा आव." धाकट्यानं काडी खुपसली.

"तोंड संभाळून बोल. थोबाड रंगवून सोडीन." थोरल्यानं डोळे लाल केले.

"थोबाड रंगवायला तुझा प्रपितामह आला पाहिजे." मधल्यानं जाबसाल केला.

शब्दानं शब्द वाढला. भांडण हमरीतुमरीवर आलं. तिघांच्याहि कपाळावरच्या शिरा फुगल्या. डोळे आग ओकूं लागले. आज एकमेकांचा गळा धरायला निघालेले हे तिघे भाऊ एका वर्षापूर्वी मानेवर मान टाकून नांदत होते हें सांगूनसुद्धां कोणाला खरं वाटलं नसतं. घारीमावशी कपाळावर हात मारून घेऊन रडूं लागली. आपण कुठलें बोलायला गेलों असं त्या म्हातारीला झालं. सुनांनींहि घरांतून आपापल्यापरी हेल काढले. या उफाळल्या धूमकेतूंवर पाणी ओतून त्यांना थंड करायला त्या पंच मंडळीला बरेच सायास पडले.

अशा तापलेल्या वातावरणांत पडवीवर ती बैठक सुरू झाली. सगळ्या स्थावर-जंगमाची यादी झाली. वांटप कसं करायचं, कोणता वांटा कोणी घ्यायचा याबद्दल वादंग माजलं. प्रत्येक मध्यस्थ आपापल्या कुळाची बाजू उचलून धरूं लागला. ती संध्याकाळ संपली; पण वाद संपला नाहीं. रात्र पडली, गांवांतले दिवे लागले अन् कांहीं वेळानं मालवले. शेजारपाजार अन् गुरंढोरं झोंपलीं. पाटाखालच्या कुळागरांत केळीपोफळी दंव पिऊन स्तब्ध झाल्या. वहाळापलिकडच्या उंच सांतिवगावर बसलेल्या दिवाभीताचे घूत्कारहि थांबले; पण घारीमावशीच्या पडवीवरचे फूत्कार मात्र थांबले नाहींत. ते सख्खे भाऊ तसूतसूसाठीं तणतणत होते. आपल्याला अधिक नसलं तरी त्यांतल्या त्यांत चांगलं असेल तें मिळावं म्हणून इरेस पेटले होते.

घारीमावशी माजघरांत अंथरुणावर पडली होती; पण त्या दिवशीं तिची शय्या कंटकांची झाली होती. कसं होतं अन् कसं झालं हा चित्रपट तिच्या तारवटलेल्या डोळ्यांपुढून सरकत होता. या मुलांच्या बाळमूर्ति तिच्यापुढें उभ्या राहिल्या होत्या. लागोपाठ हे तिला तीन मुलगे झाले होते अन् तिची कूस धुतली गेली होती. थोरल्याची मुंज झाली होती अन् मधल्याची करण्याचा बेत चालला होता. एवढ्यांत तिचं मंगळसूत्र तुटलं होतं. तिच्या नवऱ्याला अपघाती मरण आलं होतं. तो बाजाराहून वैशाखांतल्या दुपारच्या कढावर घरीं आला होता. एवढ्यांत पाटाखालच्या झाडावर फणस पिकल्याचा त्याला वास आला होता. तो झपझप त्याच्यावर चढला होता अन् फणसाचं देंठ तुटायच्या आंत स्वतःच खालीं आला होता आणि त्यानंतर दोनच दिवसांत—

वडील गेले, आईनं आंतल्या खोलींत जमिनीवर पासल घेतली, रडून रडून ती आटली, चोपून निघाली, घरादारावर अवकळा पसरली, हें पाहून तीं हूड पोरं एकदम बदललीं होतीं. शहाणीं झालीं होतीं. आईवर त्यांची विशेष माया जडली होती. आईच्या हृदयावरचा घाव उकलेल असं वर्तन ते सहसा करीत नसत. घारीमावशी दुःखद स्मृतीच्या वावटळींत सांपडून न्हाणीशीं, खोपीशीं कुठें तरी कोमेजून बसली कीं थोरला मुलगा जवळ बसून तिला म्हणे. ' आई रडूं नको आम्ही तिघे आहोंत तुला. बघ आम्ही कसा संसार सांभाळतों तें. '

तिन्ही मुलगे कसे एका रंगाचे, एका चणीचे अन् एका अंगठश्याचे. एकाला लपवावं अन् दुसऱ्याला काढावं. ते तिघेहि वाढले होते, मोठे झाले होते, कर्तृत्वी निपजले होते पूर्वीं ज्या शेतांत बापाचं एकच जोत फिरे, तिथें आतां तीन चालू झालीं होतीं. कुळागराची अवकळा घालवून तें त्यांनीं हत्तीच्या पायासारखं केलं होतं. भाताच्या राशी घरांत येऊन पडूं लागल्या होत्या. ज्या शिंपट्याला पूर्वीं शंभर पोफळं जेमतेम धरायचीं तें आतां एका गड्याला पेलेनासं झालं होतं.

घारीमावशीच्या घरांत दोन्ही दारांनीं लक्ष्मी येत राहिली होती. घर भरलं होतं. दार ओसंडलं होतं. घारीमावशीचे पांग फिटले होते. शेतांतल्या चिखलांत अन् कुळागरांतल्या तांबड्या मातींत लोळून घोळून ते दुपारीं घरीं येत होते अन् पंगतीला बसून शेराशेराचा ठाव उठवीत होते. यांच्या जेवणाला आपलीच तर दृष्ट लागणार नाहीं ना अशी घारीमावशीला भीति वाटत होती तें जेवण त्यांच्या शरीरश्रमांची साक्ष होतं.

थोड्याच दिवसांत वधूपित्यांच्या नजरा त्यांच्याकडे वळल्या होत्या. लागोपाठ तिघेहि चतुर्भुज झाले होते. घारीमावशीला धट्टयाकट्टया, कामसू अशा तीन सुना आल्या होत्या. तिला आकाश ठेंगणं झालं होतं. मागचीं सगळीं दुःखं विसरून ती आतां नव्या जोमांत आली होती. गांवांत आतां तिची प्रतिष्ठा वाढली होती. तिच्या शब्दाला वजन आलं होतं. कामाधंद्याचा, शेतीवाडीचा विषय निघाला कीं शेजारणी तिला म्हणत, ' तुझं बाई काय ? तुझे धर्म, भीम, अर्जुन एका रथावर बसले आहेत ना ! ते इकडचा डोंगर तिकडे उलथून घालतील...'

शेजाऱ्यांनीं आपली तुलना कुंतीशीं केलेली ऐकून धारीमावशीला आंतून हर्षाचे उमाळे येत हें खरं; पण त्याच वेळीं मनाच्या आंतल्या कुठल्या तरी कप्प्यांतून अशुभाची शंका अंकुरून उठे. ती मग देवघरांत बसून देवाला मनोभावें आळवी, 'देवा पांडुरंगा, हे दिवस तुझ्याच कृपेनं दिसले. माझे तिन्ही मुलगे कसे 'एकचित्त एकमत्त' वागतात. त्यांची हीच बुद्धि कायम ठेव. माझ्या सुखाभरल्या संसारावर कोणा पाप्याची दृष्ट पडूं देऊं नको.'

पण चक्रनेमिक्रमाप्रमाणें तशी दृष्ट पडली होती आणि त्याच गोष्टीचे पडवीवर उठणारे ध्वनि-प्रतिध्वनी धारीमावशी आज त्या शांत काळ्या रात्रीं ऐकत पडली होती. एकाच कुसव्यांतून आलेले ते तिघे बंधू प्रेमाला मूठ मारून एकमेकांचे दावेदार बनले हें पाहून तिच्या अंतःकरणाला सहस्र विंचू डसल्याच्या वेदना होत होत्या.

आपली वांटणी होत आहे हें त्या कुळागरांतल्या केळी-पोफळींना, शेताच्या कुणग्यांना, डोंगरावरच्या काजूंना, मळींतल्या माडांना, घरांतल्या भांड्यांकुंड्यांना, गोठ्यांतल्या गाई-बैलांना, कुण्णा कुण्णाला माहीत नव्हतं. पण त्यांना कळलं नसलं तरी वांटणी व्हायची ती झाली. मध्यरात्रीनंतर सगळं ठरलं. सर्व स्थावर–जंगम तीन ठिकाणीं विभागण्यांत आलं. आतां एकाच वस्तूची वांटणी राहिली होती अन् ती वस्तु म्हणजे सजीव, चालती, बोलती, जन्मदात्री त्यांची आई !

आईची वाट काय? ती कोणाच्या वांट्याला जायची? तिची मालकी कोणाकडे? थोरला उदार होऊन म्हणाला, 'आई राहील माझ्याकडे.' बाकीच्या दोघांनीं मनांत म्हटलं, 'तथास्तु! हवी आहे कोणाला म्हातारीची ब्याद!' पण एवढ्यांत थोरल्याच्या बायकोनं त्याला खूण करून घरांत बोलावलं. तो उठून गेला. धर्मपत्नीनं त्याला काय बोधामृत पाजलं तें तो बाहेर येतांच सर्वांना कळलं.

"आई कांहीं माझी एकट्याचीच नाहीं. तिच्या पोषणाचा भार सर्वांनीं समप्रमाणांत उचलला पाहिजे." थोरला आपलं पूर्वीचं मत बदलून बोलला.

पुराणकाळीं पांडवांच्या घरीं नारदानं त्यांच्या भार्येची–द्रौपदीची–

' मासद्वययुत बारा रजनी ' अशी विभागणी करून दिली होती. इथें मध्यस्थांनीं या भावांच्या आईचे वांटे करून दिले. ' प्रत्येकाच्या घरीं चार चार महिने. '

घारीमावशीला तें ऐकून जिवाचा उबग आला. आपली ही वांटणी नसून विटंबना आहे असं ती समजली. तिला एकदां वाटलं कीं बाहेर जाऊन पोरांना सांगावं. ' असं कशाला करतां ? मला जिवें मारा अन् माझीं हाडं वांटून घ्या ! ' पण अंथरुणावरून उठण्याइतकी तिला ताकदच उरली नाहीं. ती त्राग्यानं बोलली असती तरी त्याचा कांहीं उपयोग झाला नसता. गोठ्यांतली जशी मोनजात तशी घरांतली घारीमावशी.

आदल्या रात्रीं ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवसापासून ' वेगळेचार ' हळूहळू अमलांत येऊं लागला. प्रत्येकानं आपल्या शेतीवाडीच्या चतुःसीमा दगड पुरून निश्चित करून घेतल्या. गुरं वेगवेगळ्या जागीं गवाणी उभ्या करून बांधलीं जाऊं लागलीं. प्रत्येकाला नवं घर कांहीं ताबडतोब बांधणं शक्य नव्हतं आणि त्याच घरांत वेगळ्या चुली मांडायच्या म्हणजे नव्या भिंती उभारणं, नवीं दारं पाडणं जरूर होतं. तेंहि त्यांनीं थोड्याच दिवसांत पार पाडलं. तें प्रशस्त घर सांकड झालं, आकुंचित झालं. एकाचं पुढील दार पूर्वेला तर दुसऱ्याचं पश्चिमेला अन् तिसऱ्याचं उत्तरेला. ज्या घरांत घारी-मावशी पन्नास वर्षं अनिर्बंध सगळीकडे वावरली त्याच घरांत आतां तिच्या संचाराला पायबंद बसला.

गुरांना बिचाऱ्यांना काय ठाऊक कीं आपले धनी आतां बदलले आहेत. तीं नेहमींच्या संवयीप्रमाणें अजून पूर्वींच्याच गोठ्यांत येत. तिथून नव्या जागीं येतांना नव्या मालकाचे तडाखे खात. मुलं कसला तरी वास आला कीं चोरपावलांनीं दुसऱ्या बिऱ्हाडांत शिरत अन् तींहि मग आपल्या आयांच्या हातचा खरपूस प्रसाद खात. घारीमावशीला त्याच कारणासाठीं शब्दांचा मार मिळे. पण जितक्या लवकर मुलं ' शहाणीं ' झालीं तितक्या लवकर घारीमावशीला मात्र शहाणं होतां आलं नाहीं.

पुढच्या वर्षीं त्या एका घरांत तीन गणपति बसले. मरून पितर झालेल्या बापाला पुढच्या पक्षपंधरवड्यांत एका घरीं तीन ठिकाणीं पिंड मिळाले.

निदान त्या दिवशीं तरीं तिघां मुलांनीं एकत्र यावं, पितरांचा प्रसाद एका ठिकाणीं एका पंक्तीला घ्यावा अन् आपल्या पाठीला पोक लागलं असलं तरी आपण त्या दिवशीं सगळ्यांना वाढावं असं घारीमावशीला वाटलं तिनं भीत भीत थोरल्याला तशी सूचनाहि केली. पण मुलाच्या आधीं त्या गोरेल्या सुनेनंच ती उडवून लावली... 'त्यांना शिजवून वाढण्यापेक्षां मी 'गांवा-बाहेरच्यांना' बोलावून जेवूं घालीन.'

त्या वर्षीहि शेतांत पिकायचं तेवढं भात पिकलं; पण तें एका राशीवर न येतां तीन दरवाजांतून वेगवेगळ्या दारांत शिरलं. प्रत्येकाची सुपारी वेगवेगळ्या अंगणांत वाळू लागली. तिला त्या वर्षीं सगळ्या भाताची रास पहायला मिळाली नाहीं. सगळ्या शिंपस्त्र्याची चाकी उभारलेली दिसली नाही. मोठं, विपुल, ढीगभर पहायची तिच्या डोळ्यांना किती तरी वर्षे संवय लागली होती. आता सगळ्या घरांत थोडं थोडं आलेलं पाहून तिला वाटे, कसं चालणार एवढ्यांत या माणसांचं !

तिला सगळ्यांचीच काळजी वाटे; पण त्यांतल्या त्यांत थोरल्याची अधिक सगळेच मुलगे तिचे; पण थोरल्याकडे तिचा विशेष ओढा होता आणि तिन्ही सुनांत धाकटी तिला पोटच्या मुलीसारखी वाटत होती. तिन्ही मुलगे घारीमावशीची उपेक्षा करण्यांत, प्रसंगविशेषीं तिला निखंदून बोलण्यांत अन् असून अडगळ मानण्यांत एकाहून एक सरस होते. दोन्ही सुनांनीं तर तिला केव्हाच 'शेणावर काढली' होती फक्त धाकटीचं मन तेवढं सासूविषयीं मृदु होतं.

त्याच घरांत चार चार महिन्यांनीं तिची जागा बदले. अमावास्येला ज्या भिंतीच्या उजव्या अंगाला ती झोपायची त्याच भिंतीच्या डाव्या अंगाला प्रतिपदेस तिचं अंथरुण पडायचं. घारीमावशीला एकटं अन् मोकळं झोपणं कधींच ठाऊक नव्हतं. कोणी ना कोणी तरी नातवंड तिच्या कुशींत असायचंच. चार महिन्यांत त्याला तिचा लळा लागायचा.

अशीच ती एक दिवस थोरल्या मुलाकडून मधल्याकडे आली होती. थोरल्याचा पांच वर्षांचा पांडुरंग त्या मुदतींत तिच्याकडे जेवत असे, झोपत असे. आजीच्या गोधडींत गुरंगुटी केल्यावांचून त्याला झोपच यायची नाहीं.

घारीमावशीचं घर बदललं त्या दिवशीं तो उघडा पडला. ‘ मला आजी हवी ’ म्हणून त्यानं सूर धरला. आईनं त्याला खूप समजावलं; पण त्याचा आजीचा नामजप कांहीं बंद होईना. घारीमावशी भिंतीच्या पलीकडून तें ऐकत होती. तिचा वत्सल आत्मा तिळ तिळ तुटत होता. ‘ पांडुरंगा, ही बघ रे मी इथं आहें ’ हे शब्द आंतून तिच्या ओठापर्यंत आले; पण उमटले मात्र नाहींत. तिनं हळूच मधलीला विचारलं.

“ आणूं का गे त्याला इथं माझ्याकडे ? ”

त्यावर मधलीनं जिवणीचा मुरडून कानवला केला अन् सासूच्या तोंडावर उत्तर फेकलं तें हें—

“ नको आहे एवढा पुळका यायला. घरचं खाऊन लष्करच्या भाकऱ्या भाजायला नकोत कांहीं. इथें आहेत तींसुद्धां नातवंडंच आहेत तुमचीं.”

घारीमावशीनं पांघरूण वर ओढलं अन् कूस फिरवून ती स्तब्ध राहिली. त्याच वेळीं पलीकडच्या बाजूनं रडत्या पांडुरंगाला चडकण बसलं तें तिला ऐकूं आलं अन् पाठोपाठ त्या गोरेल्या सुनेचे शब्द—

“ मेल्याला आजी हवी. आई आहेना जिवंत अजून ! ”

त्या रात्रीं घारीमावशी किती तरी वेळ तळमळत राहिली. एका काळीं मांजरासारखे ‘ घिस् घिस् ’ करणाऱ्या तिच्या घाऱ्या डोळ्यांतून मूक अश्रू ओघळले, तिच्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्यांतून खालीं आले अन् त्यांनीं तिची उशी भिजवून टाकली. सकाळीं दिशा फांकायच्या आंत ती उठली, आपल्या नित्य क्रमाला लागली, पण खुषीनं नव्हे; तर अप्रसन्न मनानं.

असं कांहीं झालं कीं घारीमावशीचा तो दिवस संपतां संपत नसे. तिच्या पोक लागलेल्या पाठीला उगीच रग लागे. मुलगे अन् सुना यांनीं मांडलेल्या या कुरुक्षेत्रांत तिचा सर्व बाजूंनीं कोंडमारा होई. तिला इकडून तिकडे जायला बंदी. दुसऱ्या घरच्या मुलांवर माया करायला बंदी. सगळ्यांना डोळाभर पहायचीसुद्धां बंदी. तिनं नातवंडं खेळवायचीं; पण ज्या घरीं ती असेल तिथलींच. पुष्कळदां सगळीं मुलं पाटावर एकत्र जमत. घर वांटलेलं असलं तरी पाट सामायिक होता. घारीमावशी तिथेंच धुवायला, भांडीं घासायला जायची. अशा वेळीं दुसऱ्या घरचं एखादं मूल धांवत तिच्याकडे येई अन् हातांतली वस्तु तिला दाखवून म्हणे.

" आजी, आजी, ही बघ मी गवताच्या काड्यांची टोपली विणली आहे..."

त्यावर दुसऱ्या त्याच्या भावंडानं त्याला म्हणायचं.

" अरं, आजी आतां आपली नाहीं. त्या वरच्या घरची आहे."

असं कांहीं तरी लागट बोलणं ऐकलं कीं वाळलेल्या शेंगेसारख्या झालेल्या त्या म्हातारीच्या उरांत कालवाकालव होई. तीं माणसं कांहीं म्हणोत, कांहीं समजोत; पण ती सर्वांची होती. त्या तिन्ही बिऱ्हाडांतील सगळीं लहानमोठीं तिचीं होतीं. तिला वाटे; या मुलांनीं काय पाप केलं आहे ? यांना हीं कुंपणं कां म्हणून ? कौसल्या, सुमित्रा, कैकेयी या तर बोलून चालून सवती. पण राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न हीं त्यांचीं मुलं सगळ्यांच्या महालांतून धांवत, खेळत नव्हतीं का ? सगळ्यांचं कौतुक मिळवीत नव्हतीं कां ? मग आपल्याच घराला असं काय झालं आहे ?...

मधल्याच्या घरीं असतांना जर तिथें कांहीं तरी अपूक पदार्थ शिजला तर तिला मोठ्या मुलाची हटकून आठवण व्हायची. ' थोरला या भाजीला जीव टाकतो. ' ती मनांत म्हणायची. राजरोसपणें त्यांतली बचकभर नेऊन थोरल्याच्या पानांत वाढणं हें तिला शक्य नसायचं. मग तिच्या मनांत चोरीची इच्छा बळावायची. सून कुठें आजूबाजूला होते का, हें पहाण्यासाठीं तिचे अधू होत जाणारे डोळे एकदम तीक्ष्ण व्हायचे. तशी संधि मिळतांच तिनं एक विरीचा द्रोण उचलायचा. पातेल्यांतला पदार्थ त्यांत बेतानं काढून घ्यायचा. पुनश्च पळी फिरवून त्यांतली पोकळ जागा भरून काढायची आणि मग तो द्रोण पदराखालीं लपवून हळूच थोरल्याच्या घरांत प्रवेश करायचा.

" सुने, वेळूच्या कोंबाची भाजी आहे. जेवतांना वाढ त्याला. "

पण घारीमावशीची माया, तिचं आतडं जाणावं कोणी ! चार बाळंतपणं सोसूनहि गालांवरची लाली कायम टिकवणाऱ्या त्या उंच्यापुऱ्या गोरेलीच्या नाकाचा शेंडा एकदम फुलायचा.

" असला ' लांडे कारभार ' सांगितला आहे कोणी तुम्हांला ! आम्हांला अजून भीक लागली नाहीं. तशीच वेळ आली तर मग या वाढायला. उचला तो द्रोण. "

सुनेचा तो भडिमार ऐकून म्हातारीचा जीव गोळा व्हायचा. ती कळवळून म्हणायची.

" बाई ग ! तुला नको असलं तर मी परत नेतें. पण मोठ्यानं बोलूं नकोस. मधलीनं ऐकलं तर ती आणखी माझी खेटरपूजा बांधील. "

ही अगदींच साधी गोष्ट. पण एक दिवस गोरेलीनं तिच्यावर कहर केला होता अन् त्या रात्रीं तिला उपाशीहि ठेवलं होतं. तिचा अपराध काय, तर धाकटा मुलगा तापानं आजारी होता म्हणून ती थोडा वेळ त्याच्याजवळ जाऊन बसली. धाकट्या सुनेच्या थोडी मदतीलाहि लागली. आपल्या घरच्या मुक्कामांत तिनं असं करणं म्हणजे खाल्लया घरचे वासे मोजणं असं गोरेलीला वाटलं. तिनं तें नवऱ्याच्या कानावर घातलं आणि दोघांनीं मिळून तिला जीव नकोसा केला. दुसऱ्या दिवसापर्यंत त्या शिळ्या कढीला ऊत येत राहिला होता.

ती संध्याकाळीं उठली अन् वरच्या तळीवर जाऊन बसली. ती तळी हें तिच्या अरण्यरुदनाचं ठिकाण होतं. तो अल्पसा जलाशय आपल्या सांठलेल्या पाण्यांत घारीमावशीचे चार अश्रुबिंदू खुषीनें सामावून घेई. त्या तळींतल्या मासोळ्या पडलेलं फळ शंभरजणी मिळून खात होत्या. कांठा-वरच्या अशोकावर बहरलेल्या पुष्पगुच्छांतला मध चाखण्यासाठीं आलेले तांबडे हुमले एकाच घोंडुऱ्यांत रहात होते. त्याच्या शेजारच्या भिरंडीच्या शेंड्यांत किती तरी कावळे एकमेकांना हाका मारीत शिरत होते आणि रात्रभर एकत्रच मुक्काम करीत होते. घारीमावशीला त्या गोष्टीचं कौतुक वाटे. ' मानवेतर योनींतल्या या प्राण्यांना कुटुंबांत राहणं आवडतं, मग माझ्या शहाण्या मुलांनाच तें कां आवडूं नये ! ते उत्पन्नानं विभक्त झाले हें ठीक; पण त्यांनीं ' भावकी ' कां सोडावी ? वैर कां धरावं ? अशानं कोणतं हित साधणार आहे यांचं ! '

विशेषतः घर बदलायचं झालं कीं, तिची अशा प्रकारची अस्वस्थता वाढे पहिलं बिऱ्हाड बदलायच्या आधीं कांहीं दिवस अन् दुसऱ्यांत गेल्यावर कांहीं दिवस ती कामाच्या घाण्याला जुंपली जाई. पहिली सून सासू जायची म्हणून असलीं नसलीं कामं तिच्यासाठीं काढी अन् दुसरी

सून सासू यायची म्हणून किती तरी कामं सांचवून ठेवी. हिचे पापड तर तिचे सांडगे. हिचं मेतकूट तर तिचं तिखट. हिच्या वऱ्या कांडायच्या, तर तिचे पाकड भरडायचे.

वर्षातून फक्त चार महिने तिचे सुखासमाधानानें जात अन् ते म्हणजे धाकट्याच्या घरीं. धाकटा तिला मोजीत नव्हता हें खरं असलं तरी ती सून बरीच निराळी होती. थोरलीच्या मानानं ती जरा काळी होती. म्हणून गांवांतल्या बायका तिला ‘ काळेली ’ म्हणत. पण ती आंतून गोरी होती. तिला सासूची माया वाटे अन् कींवहि वाटे. ती कामं जमवून ठेवून सासूची वाट पाहात नसे. तिला वाटे, सासूनं आपल्या घरीं यावं अन् आठ दिवस पायावर पाय टाकून स्वस्थ बसावं. आठ महिन्यांचा शीण घालवावा.

पण माणसाचा स्वभाव कसा विचित्र असतो पाहा. ‘ काळेली ’ घारी-मावशीला विसांवा घ्यायला आग्रह करी, तरी ती तरण्या मुलीच्या दमानं सगळीं कामं उरकी आणि तें दिसलं कीं गोरेली अन् मधली आपापल्या-परीं तिला टोंचीत. ‘ आतां पाहा म्हातारीला कसं बारा हत्तींचं बळ आलं आहे तें ! आमच्या घरीं आली कीं तिची कंबर धरते अन् कणा मोडतो. ‘ नावडतीचं मीठ आळणी अन् आवडतीचा--’

घारीमावशीच्या ताणलेल्या, फाटलेल्या जीवनांत ही धाकटी सून हाच काय तो एक धागा मऊ, सुखावह होता. घारीमावशी कोणाच्याहि घरीं असली तरी तिला ती अधूनमधून कुठें तरी गांठून घेई अन् ‘ घरीं येऊन चला ’ असं नुसतं ओठांच्या हालचालीनं कळवून तिथून पसार होई. घारीमावशीला तेवढ्यावरून कळे कीं, हिनं आपल्यासाठीं काहीं तरी ठेवून दिलं आहे. तिनं खाण्यासाठीं अशी ओठावर जीभ टाकली नव्हती. पण सुनेच्या समाधाना-साठीं तिला जावंसं वाटे. पण जायचं तर या कानाचं त्या कानाला कळूं न देतां जायला हवं असे अन् तशी संधि कित्येकदां तिला मिळतहि नसे. मात्र मिळाली तर ती पटकन् तिच्या घरांत शिरे. तेवढ्याच चोरटेपणानं तिचे हातपाय थरथरत असत. तिला धाप लागत असे एखादं भाजलेलं कणगर अथवा आठळ्या भाजून कुटून त्याचा बनवलेला तिखटमिठाचा लाडू काळेलीनं तिच्या हातावर ठेवला कीं तो ओठाशीं जाण्यापूर्वीं तिचे अश्रू नाकाखालीं उतरत.

" मुली, तुझं बरंभलं होणार आहे. माझं ऐकून ठेव. तुझा संसार सोन्याचा होईल. "

" अन् बाकीच्यांचा ? "

" तें मी बोलत नाहीं. फार पिडलं आहे त्यांनीं मला. नाहक, निरपराधी ! केलेलं कधीं तरी भोगावं लागतंच या जन्मांत नाहीं तर पुढच्या जन्मीं तरी. पण चुकायचं नाहीं तें..."

आणि म्हणूनच धाकटीच्या घरचा मुक्काम संपायचा झाला कीं, तिचा जीव आकुळ-व्याकुळ होई. ते दोन दिवस मग तिच्या डोळ्यांतून वारंवार श्रावणसरी कोसळत. सूनहि मग गहिंवरून म्हणे.

"सासूबाई, तुम्ही कशाला जातां ? रहा आमच्याचकडे. कायमच्याच रहा."

" नाहीं ग बाई ! मऊ लागलं म्हणून कोपरानं खणूं नये माणसानं. मी काय, अन्नाला काळ अन् धरणीला भार. माझं ओझं सगळ्यांवर सारखं वांटून पडूं दे. पुढच्या जन्माला कांहीं शिल्लक नको. सुना कशाहि वागल्या तरी मुलगे माझेच आहेत ना ! "

श्रावण संपून भाद्रपद लागतांच ती परत थोरल्या घरीं आली होती थोरल्याच्या दारांत दोडकीचा मांडव फुलला होता. काकडीच्या वेलाला हरित धूसर ' पिंपऱ्या ' लोंबत होत्या. मागील दारच्या चरींत अळवाच्या देठ्या उंच वाढून लवल्या होत्या. सहस्रधारांनीं वरसणारं आकाशमाउलीचं स्तन्य पिऊन कुळागर सुखावलं होतं. हिरव्या केळी, हिरव्या पोफळी अन् त्यांच्या मुळांत वाढलेलं गवतहि हिरवं. या हिरव्या रंगाला निराळी छटा देण्यासाठीं पोफळींच्या शेंड्याखालीं कांहीं शिपटीं आगूस पिकून पिवळसर गुलाबी झालीं होतीं. प्रत्येक शिंपट्यांतलीं चार-दोन तरी पोफळं देठापासून विलग होऊन खालीं पडत होतीं. सगळं कुळागर हिंडल्यावर एक रोवळी सहज भरून निघत होती. प्रत्येक घरीं आतां हा एक नवा उद्योग निर्माण झाला होता.

थोरल्या घरीं घारीमावशीनं तो पत्करला. कमरेला दांतरी कोयती अन् हातांत रोवळी घेऊन ती कुळागारांत उतरली. चार ओटे चढायचे, उतरायचे, प्रत्येक पोफळाला खालीं वांकायचं, थोड्या वेळानं पोक

लागलेली पाठ क्षणभर ताठ करून ‘ हरे ऽ ऽ राम ’ म्हणायचं अन् पुढें चालूं व्हायचं, असं तिचं भ्रमण चालू झालं. मधेंच एक पावसाची भुरभुरती सर येऊन गेली तेवढा वेळ ती एका केळीच्या सोपटाखालीं उभी राहिली. तिथूनच तिला मागच्या टोंकाला झडलेलीं कांहीं पोफळं दिसलीं. घारी-मावशी तीं वेंचण्यासाठीं तिकडे गेली. ज्या सीमारेषेवर ती थांबली तिच्या पलीकडचं कुळागर धाकट्याच्या वांट्याचं होतं. थोरल्याच्या सीमेंतल्या झाडाचीं कांहीं पोफळं धाकट्याच्या हद्दींत पडलीं होतीं. घारीमावशी निस्संकोचपणें त्या हद्दींत शिरली अन् तीं पोफळं गोळा करूं लागली. एक...दोन...तीन...

तिचा धाकटा मुलगा त्याच कामासाठीं त्याच वेळीं आपल्या कुळा-गरांत फिरत होता. घारीमावशी आपल्या सीमेंत उतरलेली त्याच्या काक-दृष्टीला दुरून दिसली. कपाळांत तिडीक उठल्यासारखा तो दहावीस ढांगांत तिथें आला अन् त्यानं आईला हटकलं.

“ आई ! काय चालवलं आहेस हें ? माझ्या ठिकाणांतलीं पोफळं गोळा करून थोरल्याचं घर भरतेस होय ? ”

घारीमावशी ओणवी होती ती उभी झाली. तिनं ‘ हरेऽऽराम ’ म्हणून एकवार कणा ताठ केला आणि मुलाच्या डोळ्याला डोळा देऊन म्हटलं.

“ असं कां म्हणतोस ? मला सगळेच तुम्ही सारखे. ”

“ तें अनेकवार कळलं आहे मला अन् आतांहि कळलं. ”

“ आतां काय कळलं ? हे बेडे कांहीं तुझ्या पोफळीचे नाहींत. ते आमच्या पोफळीचे आहेत बघ एकदां वर. आहे का तुझी एखादी पोफळ जवळपास इथं पिकलेली ? तुझ्या हद्दींत झडलीं म्हणून हीं पोफळं कांहीं तुझीं होत नाहींत उद्यां तुझ्या पोफळीचीं त्याच्या हद्दींत झडतील— ”

“ मला शहाणपणा शिकवूं नकोस. चालती हो माझ्या ठिकाणांतून ”

“ निघालें बरं ऽ ऽ ! ”

आणि घारीमावशी उरलेलीं फळं लगबगीनं वेंचूं लागली.

“ बरीच लतकोडगी दिसतेस कीं. मीं चल म्हटलं तरी तूं आपलं तेंच करतेस. खालच्या ओव्हापासून माझ्या ठिकाणाच्या कडेकडेनं तूं वर

आली आहेस. मला किती नागवलं असशील देव जाणे ! ती सगळी रोवळी खालीं ठेव अन् काळं कर इथून. ”

“ निघालेंच मी.” घारीमावशी शेवटचं फळ रोवळींत टाकतांना म्हणाली. तिचा एक पाय लगेच आपल्या हद्दींत पडला.

“ रोवळी घेऊन नव्हे; ती रिकामी करून. समजलं ? ” धाकट्यानं तिच्या हातांतली रोवळी हिसकली अन ती घसदिशीं स्वतःच्या रोवळींत रिकामी केली.

“ अरे, हें काय ?...हें काय ?...हें शोभतं का तुला ? हीं त्याचीं पोफळं आहेत. तुझीं नाहींत. एकहि तुझं नाहीं. कुळस्वाम्याची शपथ--”

“ पुढं आलीस तर तंगडी मोडून घालीन थेरडे-- ”

घारीमावशी तिथंच मटकन खालीं बसली. तिनं कपाळावर हात मारून घेतला. ‘ काय करायचं या पोराला अन् आपल्या कर्माला ! ’ ती धाकट्याच्या पाठमोऱ्या जात्या आकृतीकडे शून्य दृष्टीनं पाहात राहिली. आतां घरीं जायला तिचे पाय उठत नव्हते. काल तिला ऋषिपंचमीचा उपास होता त्यामुळं आधींच ती गळून गेली होती अन् आतां धाकट्या मुलानं तिचं पारणं फेडलं होतं. पण किती वेळ असं बसून रहायचं ! थोडया वेळानं तिला उठावंच लागलं. तिथून निघून तिनं पडवीवर येऊन जीव घातला. थोरला मुलगा तिथं तंबाखू चोळीत बसला होता त्यानं लगेच तिला विचारलं.

“ हें काय ? आज रोवळी रिकामीच ? ”

काय उत्तर द्यायचं तिनं ! कोणत्या तोंडानं धाकट्याचा पराक्रम सांगायचा ? दांतहि तिचेच अन् ओठहि तिचेच. घडला वृत्तान्त तिनं सांगितला असता तर त्या दोघां भावांत एकदम ‘ यादवी ’ उठली असती. मग तिला काय काय पाहावं, ऐकावं लागलं असतं, हरि जाणे ! दोघांच्या टकरींत तिलाहि चार लाथा बसल्या असत्या. जीव काचकूच करीत होता. तिला कधीं संवय नव्हती तरी ती त्या वेळीं एकदम खोटं बोलली.

“ आज एकहि बेडा झडला नाहीं. ”

खोटं पचायचं तर त्याला परिस्थिति अनुकूल पाहिजे. ती बोलून गेली खरी; पण थोरल्याला तें मुळींच पटलं नाहीं.

" काल एवढा पाऊस पडून गेला अन् आज एकहि पोफळ झडलं नाहीं ? आज तर नेहमींच्याहून अधिक झडायला हवींत. "

थोरल्याची थोरली मुलगी एवढ्यांत पडवीवर आली. येतां येतां तिनं हा पोफळांचा विषय ऐकला होता. त्याच गोरेलीची ती मुलगी. आजीची पूजा उतरवायची संधि ती कां म्हणून वायां दवडील !

" आजी खोटं बोलते, दादा ! धाकटा काकोबा नुकताच कुळागरांतून आला. त्याची रोवळी भरून सांडत होती. मीं माझ्या डोळ्यांनीं पाहिली."

घारीमावशीची मान खालीं पडली. नातीनं नेमकं तिच्या वर्मावर बोट दाबलं होतं.

" असं आहे काय ! आतां कळलं. म्हणजे माझ्या कुळागरांतलीं पोफळं गोळा करून तूं धाकट्याच्या भरीला घातलींस, खरं ना हें ? वा ऽ रे आई ! एका मुलाला लुबाडायचं अन् दुसऱ्याची धन करायची. "

" बघा बाई ! वयाच्या सत्तरीला थेरडीनं चांगलेच धंदे आरंभले आहेत कीं—" गोरेलीनं आपल्या नवऱ्याच्या बोलण्याला शेव लावला थोरल्याला त्यामुळं अधिक चेव भरला.

" हें मी चालूं देणार नाहीं आज संवय ती उद्यां पांचावर तें पंच-विसांवर ! आई ऊठ, जा आपल्या धाकट्या दिवट्याकडे अन् त्याच्या मढ्यावर घातलेलीं पोफळं परत घेऊन ये. "

घारीमावशीच्या कपाळीं तो वज्राघात होता. तिचा अस्थिपंजर एकदम धसकला. धाकट्यानं हिरावून नेलेलीं पोफळं परत आणणं म्हणजे सापानं गिळलेलं माणिक परत आणण्यासारखं होतं. अशक्य ! असंभाव्य ! बसल्या जागीं धरणी दुभंग होईल अन् सीतेला घेतलं तसं आपल्यालाहि पोटांत घेईल तर बरं, असं तिला वाटलं. तो थोरला मुलगा जणूं तिच्यासाठीं आहुति घेऊन उभा राहिला.

" चल, उठ ! शेणाच्या थाप्यासारखी बसूं नकोस. त्या दावेदाराकडून पोफळं आणल्याशिवाय तुझी सुटका नाहीं. "

घारीमावशी लाथ बसल्यासारखी उठली. लटपटत उठली. थरथरत उठली. तिची मुद्रा दीन, दीन झाली. डोळ्यांत अगतिकपणा शिगेला पोंचला. तिच्या सुरकुतलेल्या तोंडाचा पातळ ओठ लवलव करूं लागला. तिचा नवमास उदरीं वाहिलेला थोरला पुत्र कृतांतासारखा तिच्यासमोर उभा होता. फक्त त्याच्या हातीं यमपाश नव्हता इतकंच. तिनं कसाबसा एक पाय पुढें टाकला. मोठ्या शर्थीनं तो स्थिर करून दुसरा टाकला. कालच्या उपासानं थकलेल्या अन् भयानं अर्धमेली झालेल्या त्या वृद्ध मातेनं एकवार व्याकुळ दृष्टीनं मुलाकडे पाहिलं आणि एकदम त्याच्या पायावर आपलं शुष्क, जीर्ण शरीर लोटून दिलं. आपल्या वठलेल्या हातांनीं मुलाच्या पायांना विळखा घालून तिनें रडत, उसासत, गदगदत पोटच्या पोराची करुणा भाकली.

" नको रे मला असं छळूं !......त्यापेक्षां जीव घे माझा......सोडव, सोडव मला या काचांतून......! ! "



# एकवीस दिवस

माझ्या जीवनांतला तो पहिलाच पिळदार अनुभव होता. माझ्या कांतिमान् मुखचंद्राला लागलेलं तें पहिलंच ग्रहण होतं आणि तं कोणत्याहि ज्योतिष्यानं वर्तवलेलं नव्हतं. ऐन सुखाच्या राशीवर बसायच्या वेळीं तें लागलं. त्याआधीं पांच दिवस माझ्या उल्हासाच्या कळा सारख्या वाढत होत्या. सासूनं केळीचीं ताजीं गर्भपुटं उकलून माझ्यासाठीं त्याचं मखर घातल होतं. मला आंत बसवून धाकट्या नणदेकडून पहिली आरती ओवाळली होती. शेजारणींनीं वाढलीं आणलीं होतीं. पांच दिवस माझ्या अंगावरचे दागिने उतरले नव्हते. गालांवरची हळद निघाली नव्हती. सासूचं कौतुक एकेरी होऊं नये, म्हणून चौथ्या दिवशीं माझी आई साळीडाळी अन् अहेर–ओट्या घेऊन दाखल झाली होती. माझ्या सुखाचं माप शिगेला येऊं लागलं होतं.

एक माणूस त्या चार दिवसांत कसं रुटमुटतं तें मला चांगलंच पाहायला मिळालं होतं. एका बाजूनं सासू अन् दुसऱ्या बाजूनं आई अशा दोन ढाली माझ्याभोंवतीं उभ्या होत्या. पण तरीहि त्यांच्या फटींतून नयनबाण माझ्या अंगीं घुसत होते. एकतर्फीच हें युद्ध चाललं होतं. कारण माझ्या शस्त्रांची धार लज्जेनं वांकली होती. त्यांच्या त्या दृष्टींत प्रेम, कौतुक, मार्दव तर होतंच; पण सूक्ष्मशी दहशतहि होती.

पांचव्याच दिवशीं उपाध्यांनीं संस्काराचा मुहूर्त काढून दिला. सासू म्हणाली, ‘ठीक आहे.’ सकाळीं भटजींनीं येऊन स्थंडिल घातलं. दोन पाट जवळ जवळ मांडून त्यांभोवतीं रांगोळ्या काढल्या. शिकेकाईचं मऊ मऊ चूर्ण चोळून आईनं मला अभ्यंगस्नान घातलं. मी पाहात होतें, माझ्या गोंडस अवयवांवर तिची नजर ठरत नव्हती. तिच्या डोळ्यांत ओसंडणारं कौतुक पाहून मला वाटलं कीं, ती मला कुकुलं बाळ समजून माझ्या गालावर मंदोष्ण असा एक ठसा उमटवणार.

माझ्या ओलसर केसांचा तात्पुरता अंबाडा बांधून तिनं मला सासूपुढं उभं केलं. ती रेशमी पीतांबराची घडी घेऊन उभीच होती. कित्येक वर्षं बासनांत पडून राहिलेलं तें सळसळतं महावस्त्र आज प्रथमच माझ्या अंगाला लागणार होतं. मीं आधीं त्याच्या चुण्याच माझ्या अंगावर धरून पाहिल्या. माझ्या सांवळ्या तनूला त्याचा गुलाबी रंग फारच खुलतो असं मला वाटलं.

ते अलंकार, तें रेशमी पाटाव, ती आईची स्नेहाळ दृष्टि, तो नवाच कुठून तरी आलेला संकोच, ती आनंदाची श्रावणधार वरसते आहे, पण हसायची चोरी, अशी कसली तरी अननुभूत अवस्था...मला वाटलं, आजची मी ही मी नव्हेच मुळीं. अन् ते? ते तरी कुठं रोजचे होते? आचमन करा म्हटलं, करीत. आहुति टाका म्हटलं, टाकीत. पण तिळभर तरी लक्ष होतं का त्या तंत्रांत? मला वाटलं, माझ्या बाजूच्या त्यांच्या अंगाला डोळेच डोळे उमलले आहेत.

तो सगळा दिवस धांदलींतच गेला. रात्रीं जेवणं झाल्यावर ते आईला म्हणाले,—

"आई गे! मी जरा बाहेर जाऊन येतों. पलतडीस परांजप्यांच्या घरीं गांवकीचा मेळा आहे. वहाळाला घातलेला बांध एका बाजूनं ढांसळला आहे; त्याची दुरुस्ती कशी न् केव्हां करायची, याचा विचार करण्यासाठीं सगळे गांवकरी जमणार आहेत."

"जा; पण लवकर ये हं!" सासू म्हणाली.

ह्यांनीं 'बरं' म्हटलं. लगेच पोफळीच्या कांबींची एक चुडणी बनवली. त्यांच्या वहाणांचे चरचर आवाज पाटापर्यंत मीं ऐकले. पाटाच्या या कडे-वरून त्या कडेवर धप्पदिशीं उडी मारली तीहि माझ्या कानांवर आदळली. पुढें ते पाळंदींत शिरले. मूर्ति दिसेनाशी झाली; पण त्या काळ्याकुट्ट अंधारांत चुडणीचा तांबडा प्रकाश मात्र झपाट्यानें खालीं खालीं सरकत आहे असं थोडा वेळ दिसत राहिलं. पुढें तोहि अदृश्य झाला. मीं म्हटलं, यांनीं ओढा ओलांडला. आतां चार ओटे वर चढले कीं परांजप्यांचं घर.

यांना पाहून जमलेले लोक म्हणतील, ‘आलास का तूं ! आम्हांला वाटलं होतं कीं आज कसचा येतोस...’ मग हे नुसतं हसतील. थट्टा करणारे पांडूभावजी असले तर त्यांच्या पाठीवर एक धपका वाजवतील. त्या दोघांचं हें नेहमींच चालतं.

पण त्यापुढें मला विचार करीत बसायला सवड मिळाली नाहीं. सासूनं मला नवी साडी नेसायला सांगितलं. उरलेसुरले अलंकार माझ्या अंगावर घातले. शेजारच्या दोघीतिघी सवाष्णींना बोलावून घेतलं. मग खण, नारळ वगैरे ओटीचं सामान माजघरांत आणून ठेवलं. फुलांचे हार, तुरे, गजरे नणदेच्या हातून पुढें घेतले. दोघांनाहि शेजारीं बसवून तिला माझी ओटी भरायला लावायची होती. मी भिंतीशीं सजून उभी राहिलें. माझे डोळे खालीं; पण कान मात्र त्यांच्या वाटेकडे लागले होते. आंतून धाकधूक चालली होती. वाटलं कीं तो क्षण येऊंच नये. आजवर जें घडलं नाहीं तें कधीं घडूंच नये. न जाणो, तें किती भयावह असेल !

पण माझ्या या विचाराला कोण किंमत देणार होतं ? अन् माझं तरी हें खरंखुरं मन होतं का ? तसं असतं तर माझ्या शरीरांतला अणून् अणु असा नाचत उडत कां राहिला असता ? कान चरचरत्या वहाणांचे पाय ऐकायला असे उत्कंठित कां झाले असते ?

पण तास झाला, दोन तास लोटले, तरी ते आले नाहींत. शेजारणी किती वेळ ताटकळत बसणार ? त्यांनीं हळूच पाय काढला. उरलों आम्हीं फक्त घरांतल्या बायका. माझी आई म्हणाली.

“ असला कसला हा गांवकीचा मेळा ! कांहीं ताळतंत्र....”

सासूच्या जिवाची उलघाल सुरू झाली. तिनें ह्यांना मूर्खांत काढलं. गांवकऱ्यांनीं उठूं दिलं नसेल म्हणून त्यांच्यावरहि तोंड सुरू केलं. पण हे हवेंतले वायबार कांहीं कामाचे नव्हते. अखेर ती उठली. अंगणांतली दुसरी चुडणी पेटवून पलतडीच्या मार्गाला लागली. हातांत काठी नाहीं, पायांत वहाणा नाहींत, सोबतीला माणूस नाहीं. आई तिला म्हणाली.

“ अहो, अपरात्रीं एकट्या कुठें जातां ? ”

त्यावर मागें न पहातांच तिनें त्राग्यानें उत्तर दिलं.

" मला कोण खातोय् ? माझं मेलीचं नशीबच तसं. आरंभलेलं घड व्हायचंच नाहीं. "

ती ह्यांची आई होती. तिचं आंतडं जळत होतं. म्हणून ती अंधार नि भय गिळून शोधाला निघाली. आम्ही दोघी मायलेकी बकासारख्या पडवीवर बसून राहिलों. अर्ध्या तासानं चुडणी परत येतांना दिसली. पण ती एकट्या सासूची होती. तिनें अंगणांत येऊन चुडणी पायरीच्या खालीं आदळली. पेटत्या कामट्या विस्कळ झाल्या आणि विझल्या. पण तीच आग माझ्या हृदयांत प्रज्वलित झाली. माझा प्रश्न आईनंच विचारला.

" काय झालं ? "

" काय व्हायचं ! तो नाहींच तिथें. कुठें गेला तें कुणीच सांगत नाहीं. तो पांड्या आहे म्हणे त्याच्याबरोबर ! कुठें उधळले दोघेहि देव जाणे ! "

अन् मग सासू किती तरी वेळ एकटीच बोलत राहिली. झाला प्रकार तिला अशुभ वाटला होता. तिच्या अंतराची तडफड चालली होती. घरीं आले नाहींत हें दुःख अन् कुठें गेले त्याचा पत्ता नाहीं ही चिंता, असा दुधारी खंजीर तिच्या काळजांत रुतत होता.

तिच्या आज्ञेवरून मी माझी वेषभूषा उतरायला लागलें. प्रथम गळ्यांतली वज्रटीक नि गळेसरी काढली. मग वेणींतलीं सुवर्णफुलं खुडलीं. कानांतल्या बाळ्या-बुगड्या दूर केल्या. नथ काढून नाक हलकं केलं. हातांतल्या पाटल्यांना रजा दिली. साडी बदलण्यापूर्वी कमरपट्टाहि काढला. माझे सगळे अवयव हलके झाले. पण हृदय मात्र शिळेसारखं जड झालं. चढलेला शृंगार सार्थकीं न लागतां उतरला, हें शल्य मला बोचूं लागलं. त्या शृंगारावर ह्यांची लोभस दृष्टि पडली नव्हती. त्याला त्यांच्या टपोऱ्या बोटांचा स्पर्श झाला नव्हता. केवळ श्रम नि ओझं याव्यतिरिक्त त्याचं कांहींच फळ माझ्या पदरांत पडलं नव्हतं.

मी आईच्या शेजारीं अंग टाकलं आणि चादर डोक्यावरून ओढून घेतली. आईनें जेव्हां हळूच माझ्या अंगावर हात ठेवला, तेव्हां माझं कोंडलेलं दुःख चादरींतून बाहेर उफाळलं. आईनें मला आणखी जवळ ओढलं. लहानग्या बाळाला घ्यावं तसं अगदीं पोटाशीं घेतलं. माझ्या

वेदना मुक्या होत्या. लाजेनें त्यांचं तोंड दाबलं होतं. पण त्या आईच्या हृदयाला कळल्या. पण ती तरी माझी समजूत कशी घालणार !

मी निजलें होतें तिथून मला खोलीचा अंतर्भाग दिसत होता. तिथला हळूहळू मंदावत जाणारा समईचा प्रकाशहि दिसत होता. तिथें एक प्रशस्त शय्या अंथरलेली होती. विड्याचं तबक, वाळ्याचा पंखा, पेढ्यांचा पुडा या वस्तू तिच्या शेजारीं मांडलेल्या होत्या आजवर अडगळीची असलेली ती खोली काल सासूनें झाडूनझटकून मोकळी केली होती. तिनें सांगितलं नव्हतं; पण आजपासून ती खोली आम्हां दोघांच्या मालकीची होणार होती. एक निराळं भावविश्व तिथें फुलणार होतं चार भिंतींनासुद्धां ऐकूं न जातील अशीं गुज-गुपितं तिथें सशब्द होणार होतीं. लज्जा, संकोच खिडकीच्या लांकडी चौकोनी गजांतून नकळत पसार होणार होतीं. दोन श्वास, दोन मनं, दोन जीव तिथें दूध-साखरेसारखे समरस होणार होते. आपलं असूनहि जें इतके दिवस परकं होतं, त्याची अनोळखी फिटणार होती. आणि हा नवा साक्षात्कार घडवणार होतं कोण ? तर ती मऊ, शुभ्र शय्या. पाणिग्रहण अग्नीच्या साक्षीनं झालं होतं. हृदयग्रहण होणार होतं तें तिथल्या दीपज्योतीच्या साक्षीनें...

माझं मन सारखं आक्रंदत होतं कीं हे आज गेले तरी कुठल्या देशाला ? कोणत्या शक्तीनं त्यांना खेंचून नेलं ? माझ्यापेक्षां ती बलवत्तर कशी ठरली ? सकाळपासून मी त्यांना पहात होतें, त्यावरून ते गेल्या पावलीं परत यायला हवे होते. मग कां आले नाहींत ? कां असे अवचित अदृश्य झाले ? कोणाच्या धांवण्या धांवले ? कृष्णाची रुक्मिणी तर इथें तळमळते आहे. कोणी मित्र, कोणी नातेवाईक, कोणी दीनदुबळा प्राण संकटांत असेल का ? असल्या कामांत यांचा पाय नेहमींच पुढें. पण आज माझं महत्त्व नव्हतं का ? आजची रात्र माझ्या हक्काची नव्हती का ? माझी अशी पायमल्ली कां केली त्यांनीं ? पण ते तरी सुखरूप असतील ना ? का त्यांच्यावरच कांहीं...मला कांहींच निर्णय होईना. अर्धजागृत, अर्धसुप्त अशा कसल्या तरी मूढ अवस्थेंत मीं ती रात्र काढली.

सकाळ झाली. दांव्यावरचीं गुरं सुटलीं. शेजारच्या कुळागरांत शिंपण्याचा

घसघसाट सुरू झाला. भाव्यांच्या घराकडून, फणसांच्या राईतून सूर्यानं आपले किरण जमिनीला भिडवले. विश्वाचा सूर्य उगवला. पण माझा ?...

होय, तोहि उगवला. एकटा नव्हे, तर पांडुभावजी आणि गणपतभट याना घेऊन. पांडुभावजींच्या खांद्यावर हांत ठेवून हळूहळू लंगडत लंगडत हे येत होते. डोक्याला पंचा गुंडाळलेला, सदरा खांद्यावर टाकलेला अन् नजर खालीं. सासू पडवींत होती, तिथूनच 'आ' वासून बघूं लागली. आई उठून उभी राहिली. मीं वेणी घालण्यासाठीं केंस सोडले होते, ते दोन्ही हातांनीं आवरीत दाराआड झालें.

मंडळी न बोलतां पडवीत येऊन बसली. मीं आडून पाहिलं. ह्यांची मुद्रा उतरली होती. डोळ्यांत कसलं तरी भय ठाण मांडून बसलं होतं. त्यांच्या उजव्या पायाच्या आंगठ्याला चिंधी गुंडाळलेली होती. कांहीं तरी त्यांना झालं होतं अन् तें साधंसुधं नव्हतं. पाटावरून पांच हात उडी मारून पाळंदींत दुमदुमणारा हा तगडा पुरुष एरव्हीं असा लंगडत, दुसऱ्याच्या आधारानं चालत घरीं आला नसता.

आश्चर्याचा भर ओसरल्यावर मग सासूला वाचा फुटली. काय झालं रे ? पाय कां बांधला आहेस ?' तिनें विचारलं. कां कोण जाणे; पण ह्यांच्या डोळ्यांत आंसवं जमलीं. आपल्या बांधलेल्या आंगठ्याकडे लावलेली नजर त्यांनीं वर काढली नाहीं. आईला उत्तर देऊं इच्छिणारे त्यांचे ओठ नुसतेच थरथरत राहिले.

"काय झालं सांग कीं मला. अन् रात्रीं गेला होतास कुठें ?" सासूनें भरल्या गळ्यानें पुन्हां पृच्छा केली. तिला ह्यांच्याऐवजीं पांडुभावजींनींच उत्तर दिलं.

"कांहीं नाहीं विशेषसं. जिवाणू चावलं !"

"जिवाणूं ऽ ? अरे देवा !" सासू कमालीच्या भीतीनें उद्गारली. तिच्या अंत्रमाळा उडाल्या. आईचीहि तीच अवस्था झाली. अन् मी ? माझं काय झालं तें एका कुळस्वामीलाच ठाऊक !

"कुठें चावलं बाबा ?" सासू अधिक खोलांत शिरली.

"तिथेंच—परांजप्यांच्या आंगणांत." पांडुभावजी म्हणाले.

“ कधीं ? ”

“ काल रात्रीं, इथून गेल्यावर लगेच. ”

“ कसलं होतं ? ”

“ कसलं—म्हणजे होतं आपलं असंच. ”

“ असं गुळुमुळु करूं नको. नीट सांग मला. फुरसं, घणस, का मोठेलं ? ”

“ कांहीं असलं तरी अरिष्ट टळलं काकी. आतां त्याची वाच्यता नको. तिथें होतोंच आम्ही सगळे. लगेच धांवती केली तुम्हांला मुद्दाम कळवलं नाहीं. म्हटलं, तुम्ही घाबराल अन् त्यालाहि घाबरवाल. त्याला लगेच कोपऱ्याला नेऊन देवळांत घातलं देवाचं न्हावण पाजलं. मांत्रिकाला बोलावून मंत्रहि घातला. त्याला हिरवी, जून मिरची खायला दिली. विचारलं, ‘ तिखट लागते का गोड ? ’ तो हायसूहुईस करीत म्हणाला, ‘ चांगली तिखट लागते. ’ मग आमचा जीव खालीं पडला. रात्र जागून काढली. देवानं सकाळ चांगली दाखवली, तेव्हां म्हटलं, याला आतां घरीं न्यावं. केवढं अरिष्ट टळलं —”

सासूनं जवळ जाऊन ह्यांच्या पायाची पट्टी सोडली. बंद्या रुपयाएवढी ती जखम होती. दंशाची जागा आधीं तासणं, मग भाजणं, असे सगळे अंघोरी उपचार झाल्यामुळें तिचा विस्तार झाला होता. मध्यें तांबडी, भोंवतीं काळी असं तिचं स्वरूप होतं. दाराआडून पहातां पहातां मीं तर डोळे मिटूनच घेतले.

सासू लगेच उठली. ती घरांत येतेशी पाहून मी आणखी चार पावलं दूर झालें. तिनं अंथरूण आणून पडवींत पसरलं. हे आडवे झाले. जमलेलीं माणसं निघून गेलीं. फक्त पांडुभावजी तेवढे राहिले. मी माझ्या कामाला लागलें. पाटावर थावलीं भांडीं माझी वाट बघतच होतीं. मी ओणवी होऊन त्यांच्यावर तणशी फिरवूं लागलें. पांडुभावजी घरीं जातांना पाटावर येऊन मला म्हणाले.

“ वहिनी ऽ ! ”

माझा तणशीचा हात थांबला. मी ओणवी होतें ती उभी झालें. वाणीऐवजीं माझ्या डोळ्यांनींच त्यांना विचारलं, ' काय ? '

" रामकृष्णाला अजून कांहीं दिवस जपायला हवं. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं. त्याच्यावर लक्ष ठेव. अन्—अन् पथ्य संभाळ. त्याच्या जिवासाठीं अन् तुझ्या सौभाग्यासाठीं सांगतों. "

" म्हणजे ? "

" मला अधिक विचारूं नको. रामकृष्ण आहे उतावळा. तो ऐकणार नाहीं, म्हणून तुला सांगतों. एकवीस दिवसांचं हें पथ्य आहे. तोंवर धोका पुरता टळला नाहीं. मांत्रिकानं तसं सांगितलं आहे. सासूला सांगूं नको. तिच्या तोंडांत तें रहायचं नाहीं. त्यालाहि सांगूं नको. तो घाबरेल. माणसाचा धीर खचला कीं, मग काय हवं तें घडूं शकतं. ऐकशील माझं एवढं ? "

" ऐकेन ! " मी ओठांतल्या ओठांत म्हटलं.

त्या एका घटकेंत माझं लहानपण, अल्लडपण, सगळं लोपलं. मी एकदम मोठी झालें, गंभीर झालें. पण पांडुभावजींनीं सांगितलेलं तें रहस्य मला पेलेना. त्यानं माझी तहानभूक मारली, ओठ सुकवले अन् डोळे पाणावून ठेवले. एकच विचार माझ्या जाणिवेचा कबजा घेऊन बसला : ' ह्यांना जपायला हवं. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं... '

दुपारीं ह्यांना सडकून ताप भरला. संध्याकाळपर्यंत त्याची कमान वाढतीच राहिली. हे कांहींच्या बाहीं बडबडूं लागले. " आई गे ! ए आई ऽऽऽ ! मला विष चढतंय्. मी मरणार...तो काळसर्प खाणार... " ' त्याला त्यांतलं कांहीं सांगूं नको; तो भीतीनं गर्भगळित होईल, ' असं पांडुभावजींनीं मला बजावलं तें योग्य होतं, हें मला त्या क्षणीं पटलं.

तो ताप अर्धा भीतीचा होता अन् अर्धा त्या जखमेचा होता. पांडुभावजींनीं धीर दिला. औषधहि आणून दिलं. अन् दोन-तीन दिवसांनीं तो उतरला. आठ दिवसांत ते खडखडीत बरे झाले. नवव्या दिवशीं त्यांनीं भाताच्या मळणीसाठीं खळं सारवलं. दहाव्या दिवशीं शिंपणेकरी

आला नाहीं म्हणून सगळं कुळागर एकट्यानं शिंपून काढलं. आणि त्याच रात्रीं जेवणंखाणं आटपल्यावर सासूनं मला आज्ञा केली.

" आज त्याचं अंथरूण आंतल्या खोलींत घाल ! "

कोणतीहि पूर्वसूचना नसतांना ती आज्ञा झाली होती. त्यामुळें मी एकदम दचकलें. हे बरे झाले होते, बचावले होते, हें सगळं खरं; पण तें सासूच्या दृष्टीनं. माझ्या दृष्टीनं नव्हे. पांडुभावजींचं तें रहस्य अजून माझ्या काळजांत घुसून राहिलं होतं. तो एकविसांचा आंकडा माझ्या कानांत घुमत होता आणि डोळ्यांपुढें नाचत होता. अजून अकरा दिवस जायला हवे होते. तोंवर त्यांना जपायला हवं होतं.——जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं !

आज्ञाधारक सून म्हणून त्या गांवांत माझी ख्याति होती. शेजारणी माझ्या सासूला त्याबद्दल गौरवीत. सासू तें तोंडानं कबूल करीत नसली तरी झिडकारीतहि नव्हती. पण त्या दिवशीं मीं तिची आज्ञा पहिल्यांदा मोडली. तिच्या अभिमानाचा पहिला टवका उडवला. मी नेहमींप्रमाणें पडवींतच त्यांचं अंथरूण पसरूं लागलें. सासू माझ्याकडे टकमक बघतच राहिली. आणि मग फणकारली.

" ए बहिरटे, मी काय तुला कानडींत सांगितलं ? उचल तें अंथरूण. ने घरांत. "

पण मी जणुं कानांत बोळे घातले होते. मीं माझं काम उरकलं अन् हे पाटावर गेले होते ते परत यायच्या आंत घरांत रिगलें. पाठोपाठ दाराचा अडसरहि ओढून घेतला.

सासू हा आपला अक्षम्य अपराध समजली होती. मी आंत होतें तरी तिचे ते करडे, कोरडे शब्द दाराच्या फटींतून आंत शिरून माझ्या काळजांत घुसत होते. पण मी विवंचना करीत होतें ती ह्यांना काय वाटलं असेल त्याची. त्यांचा शब्द ऐकूं येत नव्हता येणारहि नव्हता. पण त्यांच्या अंतराचा सागर केवढा उचंबळला असेल त्याची मला कल्पना होती. ते हात चोळणार होते. आंतल्या आंत दांतओंठ चावणार होते. माझी काल्पनिक मूर्ति डोळ्यांपुढें उभी करून तिला खाऊं का गिळूं करणार

होते. पण मी म्हणत होतें कीं एवढ्यावरच भागलं तरी पुष्कळ आहे. पण माझं दुर्दैव हें कीं तेवढ्यावरच भागलं नाहीं.

त्या वेळीं बहुधा मध्यरात्रीचा सुमार असावा. कारण मी आंतून अस्वस्थ असलें तरी बाहेर सगळं शांत शांत झालं होतं. फक्त पाटाच्या पाण्याचा खळाळ तेवढा सौम्यसा ऐकूं येत होता. आणि एवढ्यांत बाहेरच्या बाजूनें खिडकीच्या दारावर टिक्‌टिक् झालं. पाठोपाठ कोवळी पण दबती हांकहि ऐकूं आली. पुन्हा दार टकटकलं. पुनश्च स्निग्ध संबोधन उमटलं. मी अर्धवट जागी होतें ती भाला बसल्यागत उठून बसलें सासूच्या देखत पुढच्या दारांतून हांका मारणं संकोचास्पद म्हणून तिचा डोळा लागलेला पाहून स्वारी या भिंताडाच्या आडमार्गानं आली होती.

मला त्यांची एकापरी दया आली; दुसऱ्यापरी मानससरोवरांतल्या प्रेमभावनांच्या सगळ्या कमळणी एकदम उमलल्या. कसल्याहि संकटांत दुसऱ्यासाठीं निधड्या छातीनें उडी घेणारा तो पुरुष या वेळीं कसा लोण्याहून मऊ झाला होता. अधीर, उत्कंठित झाला होता. एकदां वाटलं कीं हळूच खिडकी उघडावी अन् गजांशीं तोंड नेऊन त्यांना म्हणावं, ‘ मागच्या ओटीवर यावं. मी तें दार उघडतें. ’

मला वाटलं कीं ते आंत येतांच या सगळ्या अंधाराचा दीपत्कार होईल. कुठल्या तरी नव्या सुखमय सृष्टींत ते मला घेऊन जातील. तिथल्या मार्गांवर मखमलीचे रुजामे घातलेले असतील. त्यावर वृक्षशाखांनीं कमानी केलेल्या असतील. त्यांच्या अग्रांवरून शतसंख्य फुलं माझ्या अंगावर पडत रहातील. मनांतून बावरलेली; पण त्यांचा हात घट्ट धरल्यानें सांवरलेली मी पायींचीं पैंजणं रुमझुमवीत त्या मार्गांवरून हंसगतीनं चालेन. तिथल्या यक्षकिन्नरांना आमच्या रूपानं दुसऱ्या अर्धनारीनटेश्वराचं दर्शन घडेल......

पण पांडुभावजींचे ते शब्द भुंग्यासारखे काळजांत शिरून मला पोखरूं लागले. एकविसांचा आंकडा निखाऱ्यासारखा डोळ्यांपुढें धगधगूं लागला. मी उठत होतें ती खालीं बसलें. बसणंहि होईना म्हणून अंथरुणावर लवंडलें. अजून ती टिकटिक चालू होती. अजून स्निग्ध हांक कानांत भरत होती. मला तें असह्य झालं. माझ्या हृदयानं ठाव सोडला. मी गोधडी दोन्ही

कानांवरून घट्ट दाबली अन् ते आवाज माझ्यापुरते बंद केले. किती निर्दय, दगड बनलें होतें मी ! मनांतल्या मनांत मी जगदंबेला आळवलं. ‘ आई माते, ह्यांच्या मनांत माझ्याविषयीं अढी बसूं देऊं नको. माझं जीवन पोसणारा अक्षय झरा आटवूं नको ! ’

दुसरा दिवस उजाडला अन् मी त्या घरांत नतद्रष्ट ठरलें. सासूच्या चर्येवर माझ्याविषयीं तिरस्कार उमटला. तिनें माझ्याशीं पूर्ण अबोला धरला. ह्यांच्या मनाची प्रतिक्रियाहि त्याच दिवशीं पण थोड्या उशीरानें कळली. कारण सकाळीं उठून त्यांनीं शेताची वाट धरली होती. प्रहर दिवसाला ते आले तोंवर माझ्या दशम्या भाजून झाल्या होत्या. ते पाय धुऊन घरांत येतांच मीं लोणी मध्यें घालून दुमडलेली दशमी त्यांच्यापुढें ठेवली. पण त्यांनीं क्षणाचाहि वेळ न लावतां तें पान डाव्या हाताच्या चिमटीनं दूर ढकललं अन् आईला हांक मारली.

“ आई गे ! मला खायला दे ! ”

मी समजलें त्याचा अर्थ. वाढलेलं पान दूर भिरकावणं ही मला शिक्षा होती. तो माझ्याशीं पुरता असहकार होता. त्यांच्या चढलेल्या भुंवया अन् दाबून मिटलेले ओठ त्यांच्या उरांत क्रोधाचं स्थंडिल पेटल्याचं मला सांगत होते. तें स्थंडिल मी विझवूं शकत होतें. त्याच दिवशीं, त्याच रात्रीं. पण त्याचा परिणाम...

हा तर अंतःकलहाचा पहिलाच दिवस होता. अजून अकरा दिवस जायचे होते. आज माझ्यावर घरच फिरलं होतं. पुढच्या दिवसांत घराचे वासेहि फिरणार होते. दैवानं केवढी घोर समस्या माझ्यापुढें उभी केली होती ! पुन्हा एकदां वाटलं कीं यांना एकदां एकान्तीं गांठून सगळं सांगून टाकावं. ‘ अजून अकरा दिवस तुम्हांला भय आहे. मांत्रिकानं तसं निक्षून सांगितलं आहे. ज्यासाठीं तुम्ही एवढे आसुसलां आहां, तो खेळ तुम्हांला जीवघेणा ठरेल. तुम्हांला मी डोळ्यांसमोर सोसत नसेन तर मघाशीं पान भिरकावलंत तसं मलाहि कुठें तरी दूर फेंकून द्या. वाटल्यास माहेरीं पाठवा तेवढे दिवस...’

पण हें सांगायला त्यांच्यापुढें जाणं म्हणजे हरिणीनं वाघाच्या गुहेंत

...

शिरणं. उसळतं रक्त आणि विवेक याचं गोत्र कधीं तरी पटलं आहे का ? पांडुराजाची गोष्ट काय मला ठाऊक नव्हती ? माद्रीनं त्याला काय कमी विनवलं ? पण काय उपयोग झाला त्याचा ? सगळं स्वच्छ ठाऊक असूनहि त्यानं आपली मान यमाच्या फांसांत घातलीच नाहीं का ? पण माद्रीची गोष्ट वेगळी. ती रडत रहायला मागें थांबली नाहीं. त्याच्याबरोबरच तिनंहि जळत्या चितेंत जीव लोटला. आपली आहे का ती ताकद...

मी नेहमीं त्यांच्या मागावर असायची. एकवीस दिवस उलटून जाईपर्यंत त्यांना फार वेळ डोळ्यांआड होऊं न देणं हें माझं आतां मुख्य कर्तव्य झालं होतं. हे शेतावर गेले अन् उन्हं वाढलीं तरी परतले नाहींत कीं मी शेतवाडीकडे जायची, अन् पानामागून कळीनं डोकवावं तशी गडग्यामागून त्यांच्यावर नजर टाकायची ते कुळागरांत बराच वेळ रेंगाळले कीं एकदम मला आठवण व्हायची अन् गऱ्यांतून आठळी निसटावी तशी मी सासूला कळूं न देतां कुळागर गांठायची कित्येकदां माझी झुळूक ह्यांना लागे, तर कित्येकदां लागतहि नसे.

पण त्या रात्रींपासून ते माझ्यावर बिथरले ते बिथरलेच. मी समोर दिसलें कीं त्यांच्या अंगांत अवसर येई. ते मग समोर दिसेल त्या वस्तू-विषयीं निर्दय बनत. आमचं बाळं मांजर ' म्यां ऽ व ' करून जवळ गेलं कीं तें लाडकं असूनहि त्यांच्या हातची चापट खाई. गोठ्यांतलं वासरूं माझं आवडतं. मी त्याचा गळा खाजवतांना दिसलें, म्हणून त्यानं त्यांच्या हातच्या चार छड्या खाव्या. मी मग आंतल्या आंत रडावं. मला रडवणं, माझ्यापुढें लालबुंद होऊन भार काढणं, हा तर त्यांचा त्या दिवसांतला नित्यविधि झाला होता.

तें जिवाणूं त्यांना चावलं नव्हतं, तर मला चावलं होतं त्याचं विष मला बाधत होतं. मला मांत्रिक भेटला होता तो माझ्या विषलहरी कमी करणारा नव्हे; तर वाढवणारा. पण मला माझं सौभाग्य जपायचं होतं. थोडा वेळ जरी हे दृष्टीला पारखे झाले तरी माझा जीव इकडे गलबलूं लागे. प्रत्येक उगवत्या दिवसाला मी विचारायची, ' आज काय वाढणार आहेस माझ्या दैवाच्या ताटांत ? '

त्यानंतर एका दिवशींची गोष्ट. मी कुळागरांत शेणाची पाटी टाकून अन् दुपारला हवीं तीं पानं, विऱ्या कापून खाकोटीस मारून घरीं आलें होतें. एवढ्यांत शेजारचं कुणी तरी आलं अन् ह्यांचं नांव घेऊन सासूला विचारूं लागलं, ' रामकृष्ण कुठं गेला आहे ? ' सासू म्हणाली, ' आत्तांच गेला आहे भिरंड पाडून आणायला. '

ते शब्द माझ्या कानांवर पडले मात्र; काखोटीचं ओझं तिथल्या तिथें टाकून मी घराच्या मागून वर धांवले. ' हडळ आहे मेली ! ' हे सासूचे धिक्काराचे उद्‌गार मला जातां जातां ऐकूं आले; पण ते मनाला लावून घ्यायला मला सवडच नव्हती. ते कुठल्या भिरंडीवर चढणार आहेत तें मला ठाऊक होतं, कांहींहि करून मला त्यांना झाडावर चढूं द्यायचं नव्हतं. विघ्न कांहीं सांगून येत नाहीं. झाडावर चढलेल्या स्थितींत, तशा निराधार अवस्थेत यांना कांहींच्या बाही झालं तर ? याच वेळीं विषाचा संचार झाला तर ? भोंवळ आली तर ?

ती उंचच उंच भिरंड पिकून अळंग झाली होती. तिच्या खोडाला पुरुषभर उचीपासून टेकशीपर्यंत सर्व बाजूंनीं फांद्या फुटल्या होत्या. आणि त्या फळांच्या ओझ्यानं लवून एकमेकींवर टेकल्या होत्या. हिरव्या पर्णराजींत तांबड्या कोकंबांनीं नुसती मंडपघसणी केली होती. जराशी वाऱ्याची झुळुक आली, जरा कुठें झाडानं मान हलवली, कीं सटासट फळांचा खच भुईवर पडे. ती भिरंड पाडाला आली होती हें निश्चित; पण तें काम ह्यांनीं करायचं नव्हे अन् एकवीस दिवस उलटून जाईपर्यंत तर मुळींच नव्हे. आग लागो त्या आमसुलांना. जिवापेक्षां का त्याची मातब्बरी ?

हे अजून चढले नव्हते; पण त्या तयारींत होते. चिव्याच्या लांब काठीला पुढें डेलकी तयार करीत ते खालच्या एका दगडावर बसले होते. धोतराचा कांचा आवळलेला होता अन् डोक्याला पंचा घट्ट बांधलेला होता.

त्यांचा तो उघडा घोटीव देह माझ्या दृष्टीला लुब्ध करीत होता. त्यांच्या दर्शनानं माझ्या हृदयांत कसले तरी अनिर्वचनीय भाव अंकुरत होते. ते त्या दगडावरून उठण्यापूर्वीं मी भिरंडीच्या मुळांत जाऊन उभी राहिलें. ते पुढें येत असतांना त्यांच्या दृष्टीला दृष्टि भिडवून मीं म्हटलं.

" आज आपण भिरंडीवर चढूं नये. माझं एवढं ऐकावं. " डोळ्यांत कारुण्य, वाणींत मार्दव अन् अन्तरांत फुलांची कोवळीक आणून मीं त्यांना विनवलं, पण त्याचा परिणाम झाला तो उलटा. त्यांच्या डोळ्यांत रक्त उतरलं. ओठ दांताखालीं सांपडला. माझ्याविषयींच्या द्वेषाचा, तिरस्काराचा तो वेताळ पुन्हां त्यांच्या अंगांत शिरला.

" तुझं ऐकूं ? हुं: ! तूं कोण ? कोण ग तूं ?... "

" मी कोण तें जगजाहीर आहे माझ्याच तोंडून वदवायचं असेल तर आणखी दोन दिवसांनीं सांगेन. तोंवर माझं ऐका. मला अशी रागाच्या आगींत भाजूं नका. तुमच्या अन् माझ्या कल्याणासाठीं मी सांगतें. "

" तुझं कल्याण गेलं खड्ड्यांत अन् माझं गेलं मसणांत. चल, हो बाजूला. उगाच मला अधिक भडकवूं नको. तुला माझी कितीशी पर्वा आहे, तें मीं पुरतं ओळखलं आहे. तुला मी नको आहें. माझा वारासुद्धां नको आहे.... "

पण मी बाजूला सरण्याच्याऐवजीं झाडाला घोरपडीसारखी चिकटून राहिलें. ह्यांनीं विचार सोडला होता. दयामाया देशांतराला धाडली होती. पांघुरली होती ती केवळ पाषाणाची खोळ. सपास्त्यासरशीं पुढें येऊन त्यांनीं माझा हात हिसकला. मला वाटलें कीं, माझा बाहुळा निखळूनच आला. त्यांनीं मला क्षणभर समोर उभी धरली, डोळ्यांतले अंगार माझ्यावर ओतले आणि दुसऱ्याच क्षणाला मागें ढकलून दिलं. तिडमिडत मी दूर जाऊन पडलें. साध्या जमिनीवर नव्हे; तर दिंड्यांचे वीतभर उंचीचे वाळलेले धस अन् तो दगड यांच्या मध्यें. दगडाची कपार माझ्या गुडघ्याला लागली. कोपराला ओरखडलं. आणि त्यांतली एक खुटळी माझ्या डाव्या बाहुळ्यांत घुसली. क्षणभर माझ्या डोळ्यांपुढें काजवे चमकले. पण लगेच मी शुद्धीवर आलें अन् उठून बसलें. कोंपरावरून खालीं बोटां-पर्यंत रक्ताची धार वाहिली होती ती पदरानं पुसून काढली.

एवढं करून समोर पहातें तर हे भिरंडीवर झपाझप चढत आहेत. ते फांद्यांवर पाय देऊन चढत नव्हते; तर माझ्या काळजावर पाय देऊन. आतां माझा उपाय नव्हता. नाहीं तरी बायकांचा उपाय कुठें चालतो

म्हणा ! असल्या अनिर्बंध, बेछूट माणसाशीं गांठ पडली कीं, जें जें होईल तें तें पहावं ! ते सुखरूप खालीं उतरेपर्यंत मी तिथें एका काजूच्या झाडाला टेकून बसलें होतें. दृष्टि त्यांच्यासंगें भिरंडीच्या डहाळ्यांवर फिरत होती. त्यांना कव घालून जणुं त्यांचा तोल सावरीत होती.

मी घरीं येतें तों माझा अवतार बघून सासूनं सूड काढला. 'तूं आणखी कुठें गेली होतीस तडफडायला !' त्या टीचभर गांवांत मी पडल्याची, मला दुखापत झाल्याची ती वार्ता ताबडतोब पसरली. नवी मौज पहायला बायकामुलं जमूं लागलीं. मला तीं वैऱ्यासारखीं वाटलीं. देवासारखे वाटले ते फक्त एकटे पांडुभावजी. डोक्याला तेल लावलेलं, खांद्यावर पंचा, डाव्या हातीं तांब्या आणि उजव्या हातांत आंब्याच्या पानाचं दांतघासणं अशा अवस्थेंत ते पाटावर आंघोळीला निघाले होते, ते तसेच्या तसे आमच्या घरीं आले. मी माजघरांत कलत्या मानेनं भिंतीला टेकून पाय सोडून बसलें होतें. त्यांनीं मला पाहिलं; पण त्यांना माझ्याशीं बोलवेना. एवढ्यांत हे घरीं आले आणि त्यांनीं डोक्यावरची भिरंडांची पाटी अंगणांत ओतली. पडवींत येतांच पांडुभावजींनीं त्यांना फैलावर घेतलं.

" काय रे रामकृष्णा, तूं आरंभलं आहेस काय हें ? "

" काय आरंभलं आहे ? "

" वहिनीला कां छळतोस असा राहूसारखा ? "

" तो माझा प्रश्न आहे. तुला त्यांत तोंड घालायचं कांहींच कारण नाहीं. "

" अस्सं ! साप चावला तेव्हां कोपर्ड्यांच्या देवळांत नेऊन मंत्र घालायचं मात्र कारण होतं, नाहीं ? पांच मैल तुला पाठुंगळी घेऊन गेलों,—अजून खांदे दुखतात माझे—त्या वेळेला नाहीं रे विचारलंस, तुला मध्यें पडायचं काय कारण म्हणून ? "

हे चपापले, स्तब्ध झाले. पांडुभावजींनीं त्यांच्या अगदीं मर्मावरच बोट ठेवलं होतं. ते पुढें बोलूं लागले.

" तुला वाटत असेल कीं मी बरा झालों. पण बाबा, खरं नाहीं तें. उद्यांचा एकविसावा दिवस उलटेपर्यंत तुझं विष पूर्णपणें उतरलं असं समजतां

येत नाहीं. मांत्रिकानं तुझ्यापरोक्ष मला सांगितलं होतं. 'याला एकवीस दिवस जपा. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं. बायको बारा हात दूर. तरच याची धडगत आहे.' मीं ही गोष्ट वहिनीला बजावली होती. तुला अन् तुझ्या आईला सांगण्यांत कांहींच अर्थ नव्हता. तूं केवढा धीराचा आहेस तें मीं त्या दिवशींच ओळखलं होतं. तुला हें समजतं तर अन्न खाल्लं नसतंस सुखानं. नसते विकल्प मनांत आणून झोंपहि घालवली असतीस. वहिनीनं तें काम चोख बजावलं असं म्हटलं पाहिजे. नाहीं तर तूं तिला हें बक्षीस दिलं नसतंस. तुझ्या आईनं गांवभर तिचा डांगोरा पिटला नसता... "

पांडुभावजींच्या या बातेरीसरशीं त्यांच्या रागाचे मजले धडाधड कोसळले. हें रहस्य त्यांना अज्ञात होतं आणि आश्चर्यजनकहि होतं. त्यांनीं आजवर केलेली आदळआपट त्यामुळें वेडेपणाची ठरली होती.

तापलेल्या हवेवर पाणी पडल्यामुळें ती दुपार मला बरी गेली. जेवल्या-वर मला बसवेना. बाहुल्यांत वेदना सुरू झाल्या. अंगहि थोडं तापलं. मी खोलींत चौघडी टाकून पडून राहिलें. थोड्या वेळानें सासू कुठें तरी बाहेर गेल्याची संधि साधून हे खोलींत आले. त्यांची झुळुक लागतांच मी उठून उभी झालें. पळायची वाट शोधूं लागलें.

" थांब ना ! अशी उचंबळूं नको. मला आतां सगळ्या गोष्टी कळल्या आहेत. मी फक्त तुझी जखम पहाणार आहें. "

एकाएकीं मी निश्चळ झालें. ते पुढें आले. त्यांनीं माझ्या खांद्यावरचा पदर दूर करून त्या जखमेवर डोळे लावले. पहातां पहातां ते गंभीर झाले.

" आयुष्यांत तुला स्पर्श असा केला तो आज सकाळीं. पण कशासाठीं ? —-ढकलून देण्यासाठीं. तुला इजा करण्यासाठीं. जन्मभर तूं आतां माझी अढी धरशील, खरं ना ? "

मीं आवंढा गिळून 'नाहीं' अशा अर्थीं मान हलवली. त्यांनीं आपल्या हाताचा तळवा माझ्या जखमेवर ठेवला. अति हळुवारपणें. माझ्या तापलेल्या अंगाला झालेला तो स्पर्श चंदनासारखा शीतल वाटला. माझी काया आपादमस्तक मोहरली, थरारली. डोळ्यांच्या कावडी झरझर वाहूं लागल्या.

" माझा जीव वांचवण्यासाठीं तूं हें सगळं निमूटपणें सोसलंस. अन् मी मात्र तुझं रक्त--"

" असलं कांहीं बोलूं नका. तुमचं तें रुद्ररूप मीं सोसलं. पण हें दीन-रूप मला नाहीं पहावत. उगाच मनाला लावून घेऊं नका. सीतेसारखं नाजुक, निष्पाप फूल रामानं आगींत घालून पाहिलं. तुम्हीं निदान तसं तरी केलं नाहीं. तापल्यावांचून सांवलीची किंमत कळत नसते. या क्षणीं मी जें सुख भोगतें आहें, त्याच्या मानानं मीं दिलेलं मोल अगदींच थोडं आहे."

त्यांनीं अजून आपला हात माझ्य खांद्यावरून काढला नव्हता. ते माझी जखम हलके हलके कुरवाळीत होते. माणसाचं अन्तःकरण कळतं तें अशा बारीकसारीक गोष्टींतूनच. त्यांना मी हवी होतें, अन्नपाण्यापेक्षां अधिक हवी होतें. पण त्याच्याहि आधीं माझ्या दुःखाचं परिमार्जन झालेलं हवं होतं. तो साधा भोळा धोपटमार्गी पुरुष जें अजाणतेपणें, अविचारीपणें केलं, तें आतां जाणतेपणें, विवेकीपणें भरून काढीत होता.

त्या एकाच जाणिवेंत मी द्रवलें, विरघळलें. सर्वभावें शरणागत झालें. माझ्या वेदना पार्थिव होत्या; पण त्यांचं सांत्वन दिव्य होतं. तें सुख या लोकींचं नव्हतं. अन् असलंच तर हृदयाच्याहि हृदयांतलं होतं. त्या क्षणीं मला वाटलं कीं मागाहून अशी खडीसाखर मिळणार असेल तर कसलंहि कडू जहर औषध मी आनंदानं ओंठाला लावीन.



# कवटाळ

सोनं खरं का हिणकस तें कसावर घासलं म्हणजे समजतं. पण माणूस खरा का कुडा तें समजायचं साधन कोणतं? माणसाला कसं जोखायचं? त्याच्या बोलण्याचालण्यावरून? त्याच्या रंगारूपावरून? त्याच्या पोषाखावरून? त्याच्या विद्येवरून? छेः! यांतलं एकहि साधन विश्वासार्ह नाहीं. माणूस वर दिसतो तसा आंतून असता तर श्यामकांतानें आम्हांला असा अनुभव दिला नसता. 'दांताला दांत, डोळ्याला डोळा' या भावनेच्या भरांत त्यानें इतकी कडू करणी केली नसती.

आपण सूड उगवतों खरा; पण त्याची जखम निराळ्याच ठिकाणीं होणार आहे, त्यापायीं एका निरागस, अश्राप अन्तःकरणाच्या चिंधड्या उडणार आहेत, याची त्याला काय कल्पना नसेल? बी. ए. च्या वर्गांत संस्कृत घेऊन शिकणाऱ्या तरुणाच्या ही गोष्ट लक्षांत आली नसेल, यावर कसा मी विश्वास ठेवूं? माझ्या उरीं घाव बसला तो बसलाच अन् वर वडिलांनीं मिठाचं पाणी शिंपडलं. दोघांनीं मिळून मला अगदीं पुरतं 'हाय हाय' करायला लावलं.

गेले चार दिवस मी जिवंत असून मेल्यासारखी झालें आहें. माझ्या शरीरांत, मनांत, विचारांत, कशांतच ताकद उरली नाहीं. सकाळची वेळ उल्हासाची म्हणतात; पण आहे कुठें तो उल्हास! मी आंतल्या खोलींतच घुटमळतें आहें. बाहेर गेलें तर पितृदेवांना तोंड दाखवावं लागेल. तें नको आहे मला. मी आतांशा त्यांच्या डोळ्याआड रहाणंच पसंत करतें. अजून माझ्या काळजावरची जखम ताजी आहे. अजून अण्णांचे ते विषारी वाग्बाण काळजांत किसाकिसत आहेत. अजून त्यांतला एकहि बोथट झाला नाहीं. त्या दिवशीं माझ्यावर अन्योविन्य तोंड सोडतांना मी

पोटची मुलगी आहे, हें सुद्धां त्यांना भान राहिलं नाहीं. तिऱ्हाइताचा शब्द प्रमाण अन् मुलगी सांगते तें खोटं—

पण कसा प्रतिवाद करायचा त्यांच्याशीं ? मुलीच्या गळयाला विनयाचा फास नेहमीच आवळलेला असतो तिनें उलट बोलायचं नाहीं. डोळासुद्धां वर करायचा नाहीं. हाच माझ्या जागीं दादा असता तर त्यानें 'तेरी ऊपर मेरी' केलं असतं. अण्णांना दोन शब्दांत तोंडांत मारून घ्यायला लावलं असतं.

आतां बाहेरच्या खोलींतून खलबत्त्याचा आवाज येतो आहे. अण्णा पान कुटीत बसले असतील. डोक्याला पगडी असेल. खांद्यावर उपरण्याची घडी टाकलेली असेल. समोर सतरंजीची पिशवी पडलेली असेल. तिच्यांत माझ्या दहा-वीस छापील कुंडल्या असतील. स्थळं टिपलेली एक वही असेल. त्यांतलीं जीं नावं खोडलेलीं असतील तीं स्थळं बाद असं समजायचं. ज्यांच्या-वर शिसपेन्सिल फिरली नाहीं, त्यांतलं आज आधीं कोणतं घ्यायचं तें, डाव्या हातावर तंबाखू चोळून त्याची चिमूट तोंडांत टाकीपर्यंत ते ठरवतील अन् लगेच वहाणा पायांत सारतील.

हें कांहीं आजचंच नाहीं. गेलीं चार वर्षे हें असंच अव्याहत चाललं आहे. माझी मॅट्रिकची परीक्षा उतरली तो या मोहिमेचा शुभमुहूर्त. एक चातुर्मास्य वगळला तर अण्णांच्या या भ्रमंतीला कधीं खळ पडला नाहीं. नाहीं म्हणायला श्यामकांतानें जें नाटक करून दाखवलं, त्याचं भरतवाक्य होईपर्यंत गेले आठ दिवस अण्णांनीं टांगलेली पिशवी उचलली नव्हती. नाहीं तर सकाळीं उठून स्नान करायचं, संध्येचीं चार आचमनं टाकायचीं, चहाचा एक कप रिकामा करायचा, खलबत्त्यांत पान कुटायचं, तंबाखूची चिमूट तोंडांत टाकून बोबड्या शब्दांत आईला 'जातों हं ऽ ऽ' म्हणायचं अन् जिना उतरायचा. जें सकाळीं तेंच दुपारीं !

उन्हातान्हांतून वणवण अन् पायपीट करून घरीं आले कीं, ते अगदीं जीव टाकायला आल्यागत वाटतात. मग आई हळूच बाहेर येऊन विचारते. 'जमतंय् का कुठें ?' त्यावर अण्णांचं हास्यहि ठराविक आहे. त्या हसण्याचा आम्ही कोणीच गैरसमज करून घेत नाहीं. कारण तें निराशेचं, उद्वेगाचं हसणं असतं. हसायचं म्हणून हसायचं, रडूं येत नाहीं म्हणून हसायचं एवढाच त्याचा अर्थ—

दुसराहि एक अर्थ त्याला आहे अन् तो म्हणजे मी त्यांच्या गळयाला लागलें आहें हा. माझे एकदां दोहोंचे चार हात झाल्यावांचून त्यांना खाल्लेलं अन्न अंगीं लागायचं नाहीं. अण्णा अलिकडे मोरोपंतांची उक्ति वारंवार उच्चारूं लागले आहेत—'कन्या चिंताचि सर्व काळ जिला.' पण माझं लग्न असं कां लांबणीवर पडावं? मला कोणीच कसं पसंत करीत नाहीं? पण पसंत का नापसंत पाहिल्याशिवाय ठरणार कसं? श्यामकांतानें रचलेल्या नाटकांतला तो 'धीरोदात्त नायक' आमच्या रंगभूमीवर प्रवेश करी-पर्यंत आईला एकदासुद्धां कोणासाठीं चहा करावा लागला नाहीं अन् एकदासुद्धां मला तो घेऊन बाहेर जावं लागलं नाहीं. कोणी आमच्या घरीं पायधूळ झाडायलाच तयार नाहीं. वडील भिक्षुक आहेत हें ऐकून सगळे परभारेंच त्यांना वाटेस लावतात. अण्णा मग घरीं येऊन आईला सांगतात. 'अमका म्हणाला कीं, आमच्या घरीं भिक्षुकाची मुलगी आणून आम्हांला मुलाच्या हातांत कांही पळीपंचपात्री द्यायची नाहीं. तमका बोलला कीं, समाजांतली आपली पायरी ओळखावी अन् मग आमच्या सारख्यांची पायरी चढायचं धाडस करावं.'

पण मी म्हणतें, अण्णांना तरी असल्या धनिकांचे उंबरठे ओलांडायला सांगतं कोण? हुं:! कोण म्हणजे! मुलीची माया. सामान्य होतकरू मुलगा जांवई म्हणून ते कसे पसंत करतील? त्यांच्या उड्या फार मोठ्या आहेत. मुलगी मॅट्रिक झालेली; तेव्हां मुलगा निदान बी. ए. तरी असायलाच हवा. त्याला नोकरी अन् तीहि सरकारी आणि कायमची असायला हवी. एवढ्यानंच भागलं नाहीं. त्याला गांवांत घर अन् रानांत शेतहि असायला हवं. न जाणो, दैवदुर्विलासानं कांहीं भलतंसलतं झालं तर मुलीला 'अन्नासाठीं दाही दिशा' भटकावं लागूं नये. किती दूरदृष्टीचे आहेत आमचे अण्णा! अन् यासाठींच जी घरची मिळकत असेल ती सगळी एकट्या आपल्या जांवयाच्याच वांट्याला येणारी असायला हवी, असा त्यांचा आग्रह आहे. अर्थात् त्याला भाऊ असतां कामा नयेत हें ओघानंच आलं.

श्यामकांत बऱ्याच अंशीं अण्णांच्या या वरलक्षणांत बसत होता. बाप कुलाबा जिल्ह्यांतला जमीनदार अन् मुलगा एकटा नसला तरी दुकटाच होता. तेव्हां त्याला नोकरी न मिळाली तरी चालण्यासारखं होतं. शिवाय तो-

रगारूपानें उजळ होता. वयानं जरी माझ्यापेक्षां अधिक नसला तरी उंचीला ठीक होता. आमच्या समोरच्या बिऱ्हाडांत त्याचं येणं जाणं होतं. अन् अजूनहि आहे. ती मंडळी त्याची नातेवाईक लागतात. तिथल्या येण्यामुळें दादाची अन् त्याची ओळख झाली. त्या ओळखीनें तो कधीं कधीं आमच्याकडेहि येऊं लागला. दादाबरोबर चहा घेऊन प्रचलित राजकारणावर चर्चाहि करूं लागला. अण्णांना तेवढचं सूत्र सांपडलं. दोन महिन्यांपूर्वी अण्णांनीं जेव्हां त्याच्या लग्नाची कुणकुण ऐकली, तेव्हां त्यांनीं हळूच माझ्याविषयीं त्याच्यापुढें प्रश्न टाकला. प्रथम आडपडद्यानं अन् नंतर उघड. अण्णा भिक्षुक आहेत हें तोहि विसरला नव्हता. एक श्राद्धपक्ष झोडणारा भटजी आपला सासरा होऊं पहातो, हें त्याला रुचलं नाहीं. मी दाराआडून पहात होतें. तो फुण्णदिशीं उठून चालता झाला. त्याला तो अपमान वाटला होता. अण्णांना काय; त्यांनीं मानापमान कधींच गुंडाळून ठेवले आहेत.

अण्णा मला वैभवाचं स्थळ मिळावं म्हणून धडपडतात. वैभव मिळालं तर मलासुद्धां तें नकोसं का आहे ? चांगल्या वस्तूचं अवढाणं पडायला माझी जीभ का विटली आहे ? पण कोणतीहि मोठी आकांक्षा धरतांना माणसानं आपल्या परिस्थितीचा विचार करायला नको का ? उद्यां समजा, एखाद्या बड्या स्थळीं मी पसंत झालें अन् त्यांनीं आपल्या इतमामाप्रमाणें हजारांचा आंकडा उच्चारला, कीं मग बसतील अण्णा नक्षत्रं मोजीत. अण्णांनीं पैशाला पैसा गांठवून पांचशें रुपये माझ्या लग्नासाठीं पोस्टांत ठेवले आहेत. अन् तेवढ्याच भांडवलावर ते आकाशाला गवसणी घालायला निघाले आहेत. त्यांचा असा आग्रह आहे कीं, कोणत्याहि चांगल्या स्थळानें हुंड्याविना आपली मुलगी स्वीकारली पाहिजे. खरोखर, अण्णा कोणत्या जगांत वावरताहेत ? हे सगळे यांचे भ्रम कधीं कातरायचे ? अन् ते कातरेपर्यंत माझी वाट काय ?

मी म्हणतें, अण्णांचा एवढा अट्टाहास कां ? आमच्याच परिस्थितींतल्या एखाद्या चांगल्या मुलाला मी माळ घालणार नाहीं, असं यांना कधीं सांगितलं आहे ? पण माझ्या तोंडून वाचा फुटत नाहीं अन् यांना माझं मन कळत नाहीं.

अलिकडे अण्णांनीं एक नवंच वेड घेतलं आहे. ते आतांशा गृहस्थ झाले आहेत. भिक्षुक म्हणून कोणी आपल्याला दरवाजा बंद करूं नये, म्हणून त्यांनीं अलिकडे सोवळं-भांडं टाकून दिलं आहे. पूर्वीं रोज संध्याकाळीं ते जोगेश्वरीला जायचे अन् तिथल्या भिक्षुकांच्या अड्ड्यांत थोडा वेळ बसून दुसऱ्या दिवशींचं कुठलं तरी आमंत्रण मिळवून घरीं यायचे. पण हल्लीं तिकडचं जाणं बंद झालं आहे. हल्लीं कोणाची एकादष्णी नाहीं अन् परान्नहि नाहीं. देवपूजाहि सुटल्या. या सगळ्यांचा फायदा एवढाच कीं, चार पैसे दान-दक्षिणेचे घरांत येत होते ते थांबले. पण अण्णांनीं कितीहि रुबाब आणला म्हणून यांना कोणी ' राव ' म्हणणार थोडेच ! अजूनहि ते ' बनंभटजी 'च राहिले आहेत. एकदां शिक्का बसला तो का पुसला जाणार आहे !

अण्णांच्या या रुबाबाकडे पाहिलं कीं, मला इसापनीतींतली ' मोराचीं पिसें लावणारा डोमकावळा ' ही गोष्ट आठवते. कित्येकदां मला त्यांची कींवहि येते. माझ्यासाठीं ते हीं नवीं नवीं सोंगं घेतात. माझ्यासाठीं त्यांनीं आपल्या शरिरांतलं शेरावारीं रक्त आटवलं आहे. पण पोच नाहीं, परि-स्थितीचं आकलन नाहीं अन् माया आंधळी. खरंच, माझ्यावर त्यांचं अपरंपार प्रेम आहे. मी ' श्रीमंत पतीची राणी ' झालेली त्यांना पहायची आहे. पण कसं शक्य होणार तें ! लग्न राहिलं बाजूला; पण घरांतली शांति मात्र दिवसेंदिवस बिघडत चालली आहे. प्रपंचाचा सगळा भार दादाच्या एकट्याच्या शिरावर येऊन पडला आहे. त्याचे हात तोकडे पडतात अन् अण्णांचं उत्पन्न आंखडलं; त्यामुळें तोहि अधूनमधून कावूं, त्रासूं लागला आहे.

जिन्यावर वहाणा वाजल्या. अण्णा चालले आपल्या मोहिमेवर. आतां तीन तासांची निश्चिंती. आई नळावर धुणं धुते ती आत्तां घरांत येईल. ती मला हल्लीं विशेषसं बोलत नाहीं. अण्णांनीं परवांच्या त्या प्रकारापासून माझ्याशीं अबोला धरला आहे, त्यामुळें ती अधिक मृदु झाली आहे. किती झालं तरी आईचं आंतडं आहे ना ! पण मी तरी असं बसून, दुर्मुखून किती दिवस रहायचं ! दुःखाच्या अन् रोषाच्या प्रदर्शनालाहि कांहीं तरी मर्यादा आहेतच कीं. त्यांतून मुलीची जात म्हणजे सगळ्या मर्यादांनीं जखडलेली. आतां उठून कामाला लागलंच पाहिजे.

मी माझ्या वांट्याचीं सगळीं काम उरकून वेणी घालायला बसलें आहें. पण गेले चार दिवस आरसा माझ्याशीं नीट वागत नाहीं. उल्लसित मुखाऐवजीं रडकी सुरतच तो मला दाखवतो आहे. चार दिवसांपूर्वी घडलेल्या त्या घटनेचा परिणाम अजून माझ्या मुद्रेवरून पुसला जात नाहीं. डोळे अजून मलूल आहेत. गाल अजून निस्तेज आहेत. आज माझ्या वयाला एकविसावं वर्ष चालू आहे. मनांतसुद्धां हा आंकडा उच्चारायला भय वाटतं. किती निबर दिसतें मी हल्लीं ! माझा पूर्वींचा तो कोवळा रसरशीतपणा कुठें गेला देव जाणे ! चिंतेनें ग्रास केला त्याचा. आतां परत येईल का तो कधीं तरी ? मला नाहीं वाटत.

ना लग्न, ना पुढें शिक्षण अशा मधल्या स्थितींत लोंबकळतें आहें मी. अन्नाला काळ अन् धरणीला भार मला कॉलेजशिक्षण द्यायला अण्णांना पैशाचं पाठबळ नाहीं. बरं, मी टायपिंग वगैरे कांहीं तरी शिकून कुठें तरी नोकरी करतें म्हटलं तर तेंहि त्यांना पसंत नाहीं. इथें त्यांचा सनातनीपणा आडवा येतो. ' मुली नोकरीच्या निमित्तानें एकदां घराबाहेर पडल्या कीं, मग त्या आपल्या आवाक्यांत राहात नाहींत. त्या पैसे मिळवतील यापेक्षां गुण उधळतील हीच शक्यता अधिक. अन् अब्रू म्हणजे काचेचं भांडं. ' हीं अण्णाचीं मुलींच्याबद्दलचीं मतं.

एकदा वाटतं, अण्णांचे सगळे निर्बंध मोडून घराबाहेर पडावं. कुठें तरी नोकरी पहावी. कांहीं तरी हातपाय हालवावे. माणूस म्हणून जगायचा प्रयत्न करावा. पण या विचारासरशींच हातपाय लटपटतात. दिवस कुठेंहि जाईल, पण रात्रीं याच घरीं यायला हवं ना ? दुसरीकडे कोण आसरा देणार आपल्याला ! अन् दिला म्हणून तो घेणं——

एकाएकीं माझी छाती कां धडधडायला लागली ! श्यामकांताचा आवाज ऐकूं येतो आहे. तो समोरच्या बिऱ्हाडात आलेला दिसतो. बहुधा गॅलरींत उभा राहूनच काकूंशीं बोलत असावा. त्याची काकदृष्टि बहुधा याच बाजूला वळलेली असेल त्याचं समोरच्या बिऱ्हाडांत येणं म्हणजे माझ्या वांट्याला आतां तापच होणार आहे. हा पुण्यांतून कधीं काळं तोंड करील तो दिवस सोन्याचा !

कसा मेला साळसूदपणें घरीं आला त्या दिवशीं ! म्हणाला कसा—

" बनंभटजी, मुलीच्या लग्नासाठीं तळमळतां आहां ना ? एक स्थळ सुचवायला आलों आहें. मुलगा चांगला आहे. माझ्या माहितींतला आहे. नाशकाला मालकीचं घर आहे. बाप वकील आहे. मुलगाहि वकिलीचाच अभ्यास करतो आहे. घरीं गडगंज आहे. गोदाकाठीं मोठा थोरला द्राक्षांचा मळा आहे. भाऊबिऊ कोणी नाहीं. बहिणी दोघी लग्न करून दिलेल्या आहेत. मुलगा वकील झाला कीं, बापाची गादी आयती आहे......"

अण्णांना भुरळ पडण्याजोगं हें वर्णन होतं. साहजिकच त्यांनीं वृत्ती एकाग्र केल्या. तंबाखूची चिमूट हातांत तशीच ठेवून ते ऐकत राहिले. आईच्या आशेचं कमळ फुलूं लागलं. तीहि उंबऱ्यांत येऊन उभी राहिली. आणि मी ? मला काय झालं तें सांगणं कठीण आहे. मी क्षणभर बधिर झालें, शून्य झालें म्हटलं तरी चालेल. श्यामकांत एवढ्यावरच थांबला नाहीं.

" त्याला यंदा लग्न करायचं आहे. मुलगी शक्य तोंवर गरिबाची करायची आहे. अर्थात् हुंड्यापांड्याचा प्रश्न येणार नाहीं. मी त्याला सांगितलं आहे. मुलगी भिक्षुकाची खरी; पण आतां तसं म्हणतां येणार नाहीं. तिचे वडील आतां गृहस्थ झाले आहेत...बघा तुम्हांला हें स्थळ पसंत होत का ? तो बहुधा माझ्या शब्दाबाहेर जायचा नाहीं. तुम्ही सांगत असाल तर मुलगी पहाण्यासाठीं त्याला घेऊन येतों."

श्यामकांत किती गंभीरपणें बोलत होता ! जणूं हें लग्न जुळवणं त्याच्या हातचा मळ होता ! तो जणूं एक सामाजिक कर्तव्य पार पाडायला बद्धपरिकर झाला होता. एका हताश मुलीला जणूं आनंदाच्या डोहांत बुचकळून काढायला आला होता. अण्णांनीं आईला म्हटलं, 'काय ग ?' आई म्हणाली, 'मला काय विचारतां ? तुमच्या पसंतीला उतरत असलं तर बघा.'

" हे सांगतात तसं असलं तर उत्तमच आहे. पण सांगोवांगी गोष्टीवर विश्वास ठेवायला मन तयार होत नाहीं. समक्ष तिथें जाऊन पहायला हवं. पुष्कळदां बडा घर पोकळ वांसा– "

मीं मनांत म्हटलं, आली अण्णांच्या मनांत पाल. जसं कांहीं आतांच कन्यादान करायचं आहे. श्यामकांतहि या बोलण्यावर जरा रुष्ट झालाच.

' तुम्हांला पटत नसलं तर माझा आग्रह नाहीं. मुलगी तुमची आहे. तुम्ही स्थळांसाठीं रात्रंदिवस पायांची चाळण करतां हें पाहिलं म्हणून सांगायला आलों. '

त्याच्या रुष्टतेवर आईला सारवण घालणं भाग होतं. ती अण्णांना बोलली. ' असं काय करतां ? ते एवढे आवर्जून सांगायला आले तर तुमच्या आपल्या कुशंका. मुलाला इथें येऊन मुलगी पाहूं दे. आपण मुलगा पाहूं. माहितीच्या ठिकाणीं तपास काढूं अन् मग काय तें ठरवूं. ' आणि नंतर श्यामकांताकडे वळून ती म्हणाली.

" तुम्ही घेऊन या त्या मुलाला. "

" हे सांगत असले तर–"

अण्णाहि मग बोलले ' घेऊन या. ' निघालं एकदाचं उत्तर म्हणून मी सुस्कारा सोडला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्यामकांत घरीं येऊन सांगून गेला ' आज दुपारीं चार वाजतां येत आहों.' आणि आमच्या घरांत एकदम उत्साहाच्या वासंतिक वायुलहरी झुळझुळूं लागल्या. निदान माझ्या अंतरांत तरी. लग्न होवो अथवा न होवो; त्याची नांदी तरी आज सुरू होणार होती. दुसऱ्यापुढें प्रेक्षणीय वस्तु म्हणून मला उभं राहायचं होतं. त्यामुळें मी गोंधळून गेलें. शंकित मन मला म्हणालं, ' तूं पसंत होणार नाहींस. किती उतरलेली अन् सुटलेली दिसतेस तूं ! श्रीमंत वकिलाचा तरुण मुलगा तुला कां म्हणून पसंत करील ? अलिकडचे तरुण मुलगे आपलं लग्नवय वाढवतात. पण त्यांना मुलींचं वय वाढलेलं नको असतं. हे तिशीच्या घरांत गेले तरी त्यांना मुलगी मात्र सतरा वर्षांची सोनसळी हवी असते. '

नकळत माझे पाय भिंतीच्या आरशाकडे वळले. आरशानं मला एक शारदीय चंद्रबिंब दाखवलं. पूर्ण, निष्कलंक आणि ज्योत्स्नामय. मी त्या शंकित मनाला सांगितलं. ' मी पसंत पडेनच मुळीं. काय आहे माझ्यांत नाकारण्याजोगं ? केवढ्याहि मोठ्या घरीं मी शोभून दिसेन. नव्हे; तें घर मी शोभवीन. '

आई त्या दिवशीं दुपारीं झोंपली नाहीं. तिनें वळकट्या नीट लावल्या. बैठकीच्या जागेंतली अडगळ सांपसारली. स्वच्छ केर काढला. बसायचं

जाजम आंगणांत नेऊन तीनदां झटकलं. प्रेक्षणीय नसलेल्या वस्तू बैठकींतून हालवल्या. आईची धांदल मी पहात होतें. पण मी आपण होऊन तिच्या मदतीला गेलें नाहीं. कसला एवढा संकोच वाटला मला ? तिनें सांगितलं तेवढं काम मात्र मीं चोख केलं. मी वेणी घालीत होतें. आणि आई गजराच्या घड्याळांतल्या मंदगति कांट्याकडे वारंवार पहात होती. मीहि तेंच करीत होतें; पण करून न केल्यासारखं.

आणि अखेर घड्याळानें चार वाजवले. त्यासरशीं घड्याळाची ती टिक्‌टिक् माझ्या उरांत आली. त्यानंतर पांच मिनिटांत श्यामकान्त त्या मुलासह वाड्यांत शिरला. मी एक ओझरती नजर त्या दोघांवर टाकून आंतल्या खोलींत अदृश्य झालें. पाठोपाठ जिन्यावर पावलं वाजलेलीं मीं ऐकलीं. हीं श्यामाकांताचीं. अन् हीं—

अण्णा जिन्यांत जाऊन त्यांना 'या' म्हणत आहेत. बहुधा हात जोडून उभे असावे. हा बसल्याचा आवाज आला. स्वच्छ धोतर गुंडाळून तयार केलेल्या गादीच्या लोडाला टेकून ते दोघे बसले असावे अन् समोर अण्णा !

हा नवा अपरिचित आवाज चांगला भरदार दिसतो. अय्याऽऽ ! कोट्यासुद्धां करतात कीं. पण हा श्यामकांतच मोठा आगाऊ दिसतो. त्यांना बोलूं न देतां आपलीच अक्कल पाजळीत सुटला आहे. तुझं ऐकलं आहे म्हणावं मी. 'माझं घोडं अन् जाऊं द्या पुढं' असं नको करूं.

आई ताटांत कपबशा मांडून चहा ओतते आहे. म्हणजे आतां माझा प्रवेश. 'ततः प्रविशति पात्रहस्ता सुलभा.' मला बाहेर जायची उत्कंठा आहे; पण जायचं कसं हीहि धुगधुग आहे. तीन कपबशांचं हें ताट जाणार आहे का माझ्या हातून नीटपणें—

पण तें गेलं. मी तें ठेवून नमस्कार केला अन् तिथेंच मान फिरवून उभी राहिलें. 'बसा कीं. एवढं लाजायला कशाला हवं ?' हा श्याम-कांताचा शिष्टपणा. 'बस तिथें.' त्याला अण्णांचा दुजोरा. मी बसलें. तो नवा तरुण मला पाहून चुकला होता. मी मात्र अजून तशीच राहिलें होतें. मी ज्यावर बसलें होतें तें जाजम मला दृष्टि वरच करूं देईना. छे ! हें बरं

नव्हे. आजकालच्या मुलीला ही लाज शोभत नाहीं. मी डोळे वर केले. अगदीं सरळ सरळ पाहिलं. त्यांची दृष्टि माझ्या नजरेंत मिसळली. तेवढ्या-पुरती मान तिरपी करून मी पुन्हां पाहिलं. त्यांचं रुंद कपाळ, सरळ मागें वळवलेले लांब केस, उजव्या बाजूला कपाळावर अर्धवट केसांत लपलेली खोक, दोन्ही कानांच्या बाजूंना किंचित् रुंदावलेला जबडा, वरच्या ओठाच्या मध्यखळीवर छाया करणारं उभार नाक, क्षणांत मायाळू तर क्षणांत करारी वाटणारी ती अनिश्चित नजर. या सगळ्या गोष्टींवर क्षण क्षण विसावून, तिथला ठसा घेऊन माझी दृष्टि परत फिरली.

आणि मग मी त्यांच्या प्रश्नांना धीटपणें उत्तरं दिलीं. प्रश्न विचारण्या-तहि श्यामकांतानेंच पुढाकार घेतला होता. तो नवा तरुण थोडंच पण गोड बोलला तें कान भरून ऐकलं. मनांत आलं, या तरुणाशीं माझी लग्नगांठ बांधली जात असेल तर आजवर भोगलेले मनस्ताप सार्थकीं लागले असं म्हणायला हवं. ते दोघे निघून गेले. बैठक रिकामी झाली अन् मला वाटलं हें स्वप्न तर नव्हे ? असा एक नोकझोकाचा मुलगा खरंच का आपल्या-कडे येऊन गेला ? खरंच का मीं त्याच्याकडे पाहिलं ?......

त्यानंतर आई-वडिलांच्या गुह्यचर्चेत मीं भाग घेतला नाहीं. पण माझ्या-प्रमाणेच त्यांच्याहि मनांत तो भरला आहे हें ऐकून मला धीर आला. हो, नाहीं तर अण्णांचा पापड कुठें तरी वांकडा व्हायचा. आम्हा सर्वांनाच दुसऱ्या दिवसाची उत्कंठा होती. श्यामकांत त्या दिवशीं पुन्हां आला. त्यानें गोड बातमी आणली त्याअर्थीं त्याचा चहावर हक्क लागू झाला. त्यानें सांगितलं.

" मुलाला मुलगी एकदम पसंत. आज तो आपल्या वडिलांना पत्र लिहिणार आहे. आपला मनोदय कळवणार आहे. त्याच्या मर्जीविरुद्ध घरचीं कोणीं जाणार नाहींत याची त्याला खात्री आहे. आठ दिवसांत उत्तर येईल. मग पुढचीं बोलणीं करूं. "

आईनें पहिला सुस्कारा टाकला. अण्णा ओठांतल्या ओठांत हसले. माझी अटकळ खरी ठरल्याचं समाधान मीं अंतरांत उपभोगलं. इतरांचा डोळा चुकवून पुन्हां एकदां मी आरशापुढें उभी राहिलें. किती सरस

दिसत होतें मी ! जसं दंवबिंदूंनीं ओलसर झालेलं प्राजक्ताचं फूल. माझी मलाच दृष्ट लागेल असं वाटलं मला.

स्थळांची यादी अन् पत्रिकांची चवड असलेली ती अण्णांची पिशवी त्यानंतर आठ दिवस खुंटीला टांगलेली राहिली. अण्णांनीं रोजच्या संवयी-प्रमाणें सकाळीं उठून तिच्याकडे पाहिलं; पण तिची झोपमोड होऊं दिली नाहीं. अण्णांच्या त्या टांचा झिजून म्हाताऱ्या झालेल्या वहाणाहि जिन्याच्या वरच्या पायरीवर गळ्यांत गळा घालून विसांवा घेत पडल्या.

ते आठ दिवस आम्हीं सगळींच उमेदींत होतों. सुलभा आतां ‘ पळतें पीक ’ असें आई धरून चालली होती. अण्णांच्या पोस्टांतल्या रकमेचं बूड हलूं लागलं होतं. माझ्या कल्पनेला भविष्याच्या प्रांतांत प्रकाशझोत टाकण्याचा चाळा लागला होता. ते क्षणांत मायाळू तर क्षणांत करारी दिसणारे डोळे माझी पाठ पुरवीत होते. त्यांचीं न ऐकलेलीं नर्मवचनं माझ्या कानांत गुंजत होतीं. त्यांच्या न पाहिलेल्या कलाकुसरी मला मोहवीत होत्या. नाशिकचं तें घर; तो वकील सासरा, ती समृद्धि, तो यावाजावा, ते द्राक्षांचे मळे......

श्यामकांत रोज एखादी तरी खेप आमच्याकडे टाकीत होता. मी मनांत म्हणें, हा एकटाच कां येतो ? ह्याचा मित्र कां येत नाही बरोबर ! तो आम्हांला पायरीपायरीनें उल्हासाच्या शिखरावर चढवीत होता. जणूं दुसऱ्याच्या सुखांत सुखावणारा संतसत्पुरुषच ! जणूं परोपकारी पुण्यवंतच. लग्नाचा मुहूर्त कोणत्या महिन्यांत कोणत्या तिथीला धरणं सोईस्कर, इथवर त्यानें चालू विषय नेऊन भिडवला होता तो जनात वेगळं अन् मनांत वेगळं हसत होता

पण आठ दिवस झाले अन् श्यामकांताची खेप चुकली. मग दोन-तीन दिवस तो आलाच नाहीं. अण्णांना दम धरवेना. ते नाशिकच्या पत्राची चौकशी करण्यासाठीं स्वतः उठून त्याच्याकडे गेले. पण तो भेटलाच नाहीं. पुन्हां एकदां गेले तरी तेंच. तिसऱ्या खेपेला स्वारी एकदां भेटली. अण्णांनीं त्याच्यापुढें पत्राचा प्रश्न काढतांच त्यानें त्यांच्या कपाळीं वज्र घातलं.

“ मला सांगायला दुःख होतं आहे. हें स्थळ तुमच्या हातचं गेलं. तुम्ही पुढच्या मार्गाला लागा. ”

" कां गेलं ? काय झालं जायला ? मुलगी तर पसंत होती ना ? "

" मुलगी पसंत होती अन् अजूनहि आहे. पण तिचे गुण......"

" कसले गुण ? काय केलं तिनें ? माझी मुलगी सर्वांगीं निर्दोष आहे. विनय, मर्यादा संभाळून आहे. "

" प्रत्येक बापाला असंच वाटत असतं. बाकी मी कांहीं पाहिलं नाहीं हं ! तोच म्हणतो. त्यालाच कांहीं तरी वेगळं ऐकायला आलं असेल. कदाचित् त्यानं कांहीं पाहिलंहि असेल. "

" अहो, पण काय तें स्पष्ट बोला ना—"

" कशाला स्पष्ट बोलूं ? तुम्ही आपले भोळा भाव धरून आहांत तेंच ठीक आहे. मी म्हणतों हाच मुलगा तुम्हांला कशाला हवा ? ज्याच्याबरोबर ती तुमचा डोळा चुकवून फिरायला जाते, ज्याच्या संकेताची वाट पहाते, तो नाहीं का पत्करायचा तिला ? एकावर प्रेम अन् दुसऱ्याशीं लग्न हा प्रकार कसा काय जमायचा ? तो जुलमाचा रामरामच ठरेल. बाकी मला कांहीं यांतलं ठाऊक नाहीं हं ! हो, नाहीं तर तुम्ही मलाच जबाबदार धरायचे. ' बाप दाखव नाहीं तर श्राद्ध कर. ' पण मीं एक बोललों नाहीं म्हणून जगाचं तोंड कोण धरील ! मीं कुठला या फंदांत पडलों, याचा मला आतां पश्चात्ताप होतो आहे. हें सगळं ऐकून माझा मित्र तरी कसा धजेल या लग्नाला ! जाऊं द्या, बनंभटजी जाऊं द्या— "

अण्णा तिथून घायाळ होऊन परतले संतापाची शेगडी उरांत फुलवून घरीं आले. आम्ही त्यांच्या वाटेकडे डोळे लावून होतों पुढच्या दरवाजांत पडलेला त्यांचा पाय लटपटत होता. त्यांच्या मुद्रेकडे पहावत नव्हतं. माझ्या काळजांत एकदम भाला बसला. काय झालं असेल त्याची कल्पना करायला त्यांनीं मला सवडच दिली नाहीं ते आंत आले ते सरळ माझ्यावर घसरले.

" कार्टे, कशाला जन्माला आलीस माझ्या पोटीं ! कुळाला कलंक लावायला निघालीस, ती उलथून कां गेली नाहींस ! "

पुढें त्यांना शब्द फुटेना. चेहरा काळानिळा पडला. सोसावल्या निःश्वासांनीं नाकपुड्या फुलूं लागल्या. मी काय उत्तर देऊं त्यांना ? माझ्या हातून काय अघोर पातक घडलं हेंच जिथें मला ठाऊक नव्हतं, तिथें मी

काय बोलणार ! माझे थरथरणारे हातपाय त्यांच्या आरोपाला नकार देऊं लागले. पण तो नकार मुका होता. केवळ सूक्ष्म दृष्टीलाच जाणवणारा होता. पण अण्णांची दृष्टि शुद्ध अन् शाबूत होती कुठें ! अण्णांसमोर नव्हे; तर जखमी झालेल्या वाघासमोर मी उभी आहें असं मला वाटलं. खरं म्हणजे त्या वेळीं माझी शुद्धबुद्ध हरपली होती. मनावेगळं, प्राणावेगळं, शरीराचं काष्ठ तेवढं त्यांच्यापुढें उभं होतं.

" बोल कीं ! आतां कां दांतखिळ बसली ? "

आणि माझं मन आक्रंदलं. ' अहो काय बोलूं ? काय विचारलंत तुम्ही मला ? ' पण माझ्यावरचा हा गहजब ऐकून क्षणभर जडमूढ झालेली आणि लगेच सावध झालेली आई माझ्या संकटाला पुढें आली.

" काय झालं एवढं संतापायला ? काय केलं तिनें ? "

" मला कशाला विचारतेस ? विचार तिलाच ! लाज नाहीं वाटली कोण्या सोम्यागोम्याबरोबर फिरायला जायला ! कोणाला एवढी भुललीस—"

" अहो, जरा हळू बोला. शेजारचीं माणसं ऐकतील अन् काय म्हणतील ? "

" काय म्हणायचं राहिलं आहे आणखी ! सगळ्या पुण्यभर झालं आहे हें. त्या मुलाला कळलं. आतां फक्त हात धरून जायचं तेवढं बाकी आहे."

त्यांच्या तापलेल्या स्थंडिलांत आईचे कोवळे शब्द कुठल्या कुठें जळून गेले. तिला त्यांचा राग आवरतां आला नाहीं. तीच हतबल ठरली, तिथें माझी काय पाड ! अण्णा त्या दिवशीं मला नव्हे नव्हे तें बोलले. ध्यानीं मनीं नसतां जी निराशा त्यांच्यावर येऊन आदळली होती, तिनें त्यांचा सर्वस्वीं तोल सुटला होता. मीं जीव तोडून, शपथा घेऊन, कळवळून त्यांना सांगितलं कीं ' माझ्यावरचा आरोप सपशेल निराधार आहे. मीं तसलं कांहीं केलं नाहीं. जागृतींत सोडाच; पण स्वप्नांतसुद्धां. कशाला उगीच आग पाखडतां ? कोणीं तुम्हांला सांगितलं त्याला माझ्यापुढें घेऊन या. मी विचारतें त्याला...'

पण अण्णा त्या वेळीं माझं कांहींहि ऐकून घेण्याच्या मनःस्थितींत नव्हते. श्यामकांताच्या शब्दावर त्यांचा दृढ विश्वास बसला होता. पोटची पोरगी

खोटारडी, दगेबाज ठरली होती. त्या दिवशीचे ते अण्णांचे विषारी शब्द जन्मभर माझीं आंतडीं कुरतडायला पुरेसे आहेत. त्या दिवशीं त्यांनींहि अन्न खाल्लं नाहीं अन् आमच्याहि भुका मारल्या. तेहि झोपले नाहींत अन् आम्हांलाहि तळमळायला लावलं.

कां नाहीं मला श्यामकांताचा संताप येणार? त्यानंच हें कुभांड उभं केलं होतं. त्यानंच अण्णांच्या काळजांत विखार भरला होता. तो त्या वेळीं समोर आला असता तर मी त्याच्यापुढें जीभ हासडून प्राण द्यायला निघालें असतें. 'बोल, कबजीकलुशा, खरं बोल. नाहीं तर स्त्री-हत्येचा धनी हो!' पण तो आला नाहीं. मी त्याच्याकडे जाऊन त्याला फैलावर घेण्याचं धाडस करूं शकलें नाहीं. त्याला जें साधायचं तें त्यानं बेमालूम साधलं होतं. सूड घ्यायचा तो पद्धतशीर घेतला होता.

होय, सूडच घेतला होता. मला कळलं तें. समोरच्या त्या काकूंनींच सांगितलं. आपली फुशारकी श्यामकांत तिच्याकडे बोलून गेला होता. अण्णांनी त्याच्या शेपटीवर एकदां जाणूनबुजून पाय दिला होता. त्याची त्यानं डूख धरली होती. आणि आज अण्णांना कडकडून दंश करून, बरोबर माझ्याहि काळजाला डाग देऊन तो आपल्या सूडभावनेचा उतराई झाला होता.

कांहीं महिन्यांपूर्वींची गोष्ट. श्यामकांताला एक इथलीच मुलगी सांगून आली होती. वधूपिता त्याची सरळ अन् आडून चौकशी करीत होता. तो समोरच्या बिऱ्हाडांतहि त्यासाठीं आला होता. अण्णांना त्याचा कुठून तरी वास लागला. श्यामकांताच्या स्थळावर खुद्द अण्णांचाच डोळा होता ना. त्यांनीं त्या गृहस्थाला गांठून घेतलं. आपण होऊन त्याच्याकडे विषय काढला आणि वर मुखरस पाघळला.

"त्याला कशाला मुलगी देतां? मुलगा कांहीं एवढासा चांगला नाहीं. सारखा मुलींच्या मागून हिंडत असतो. मी नेहमीं पहातों. अन् घरचं सुद्धां..."

स्वतःच्या स्वार्थासाठीं दुसऱ्याच्या स्वार्थांत बिब्बा घालूं पहाणं हें तरी अण्णांसारख्या वैदिकाला शोभलं का? त्यानें साधलं नाहीं कांहींच. तो

वधूपिता पितळेच्या कानांचा नव्हता. त्यानें सगळी चौकशी करून श्यामकांताचंच स्थळ जुळवलं होतं आणि वर अण्णांनीं केलेला चोंबडेपणाहि त्याच्या कानांवर घातला होता. श्यामकांतानें त्याच वेळीं ओठ चावला असेल. त्याच वेळीं त्यानें अण्णांना प्रायश्चित्त द्यायचं ठरवलं असेल.

पण श्यामकांतानें खरा सूड घेतला तो माझा. गुढघ्याला ठेच अन् छातीला बिब्बा. हें कवटाळ त्यानें माझ्याभोंवतीं कां बरं रचावं? मीं काय केलं होतं त्याचं? पण श्यामकांताच्या या कारस्थानांत तो कसा सामील झाला? हें असलं माणुसकीला लाजवणारं कृत्य करायला त्याची मति कशी धजली? त्याचे डोळे तसं सांगत नव्हते. त्याचं तें रुंद कपाळ, तो बोलण्यांतला गोडवा—पण श्यामकांत बोलायला काय वाईट आहे? का सभ्यपणा दाखविण्यांत कमी आहे? श्यामकांत तरी असला अधमपणा आचरील हें कोणाला खरं वाटलं असतं? जसा श्यामकांत तसाच तो!

छेः, पण हें नाहीं मनाला पटत. श्यामकांतानें त्याला साळसूदपणें, ताकास तूर लागूं न देतां या कारस्थानांत ओढलं असेल. आम्हांला फसवलं तसं त्यालाहि चकवलं असेल. श्यामकांताचे हे पोटांत पाय त्याला दिसले असते तर—तो त्याच्यापासून चार हात दूर राहिला असता का? एका निष्पाप मुलीच्या अब्रूवर शिंतोडे उडवून आपण सभ्यतेला काळं फासणार नाहीं असं त्यानं त्याला स्वच्छ बजावलं असतं का? होय, त्याचे डोळे तसं सांगतात. ते जितके मायाळू आहेत तितकेच करारी आहेत. मनांत आलं तरी त्याला असलं कौटिल्य जमायचं नाहीं. मला फिरून कधीं भेटेल का तो? पण भेटला म्हणून मी काय करणार? मी त्याच्यापुढें उभी राहूं शकेन का? त्याच्याशीं बोलूं शकेन का?......

छे ग बाई! जिथें 'पर'हि नसतांना त्याचा कावळा झाला अन् मला वडिलांच्या क्रोधाग्नींत आहुति व्हावं लागलं, तिथें असलं कांहीं केलं म्हणजे मग? नको! नकोच तें!!

# चोर आहेत दोघंहि !

हरि गाढ झोपेंत असला तर उशाशीं ढोल बडवले तरी तो जागा व्हायचा नाहीं. त्याला डोळे उघडायला लावण्याचा एकच उपाय आहे. त्याच्या कानाशीं लागून हळूच म्हणावं, 'हरि, नाटक !' कीं ताबडतोब काम फत्ते !

हरीला नाटकाचा विलक्षण शौक आहे. एक वेळ रोजच्या गरजेचं पंचांग त्याच्या पडवींतल्या भिंतीला फडफडतांना आढळायचं नाहीं. पण डझनभर नाटकाचीं पुस्तकं मात्र त्याच्या घरांत सहज गोळा करतां येतील. 'एकच प्याला' त्याच्या उशागती सांपडेल. 'शारदा' पडवींतल्या बहालावर चढलेली. 'शिक्का-कट्यार' बसायच्या फळ्याखालीं धूळ खात पडलेली. आणि 'कांचनगडची मोहना' कुळागरांतल्या माचोळीवर पहुडलेली.

हिंवाळा सुरू झाला आणि गांवोगांवचे काले होऊं लागले कीं हरीचा 'वसंत' अवतरायचा. पंचक्रोशींतला कुठलाहि काला हरीच्या साक्षीवांचून व्हायचा नाहीं. कधीं आईला विचारून तर कधीं तिला चोरून. हरि कोणत्याहि काल्या–जत्रेंत दिसायचाच. तो न दिसला तर त्याला ओळखणारे दुसरे संवगडी म्हणायचे.

"अरे, हरि कुठं दिसत नाहीं तो ? जिवंत आहे ना ?" आणि थोड्या वेळानं तो ठराविक अत्तराचा सुगंध दरवळला आणि ती सावळी शेलाटी मूर्ति हातांत छडी 'रुं ऽ ऽ य् रुं ऽ ऽ य्' हवेंत वाजवीत पुढें आली कीं त्यांनीं पुन्हा म्हणायचं.

"आहे रे ! हरि जिवंत आहे."

त्यावर मग त्यानें तितक्याच खेळकरपणें उत्तर द्यायचं.

"जिवंत आहे म्हणजे ? तुम्हांला काय वाटलं ? मी मरायचा झालो तरी काल्या-जत्रेंतच मरेन."

"नको बाबा ! तेवढं करूं नको. लोकांच्या उत्सवावर पाणी ओतशील !'

आणि मग यंदां मोचेमाडकर मंडळींत नवा स्त्रीपार्टी कोण आला आहे, राजपार्टी रंगून चौफाळ्यावर येऊन बसला कीं तो भाषणाचं चऱ्हाट कसं वळतो, भावीण आरती घेऊन ओवाळणी मागायला मांडवांत फिरूं लागली कीं एका पैशासाठीं भलेभले लोक तिला तोंड कसं चुकवतात, त्यांतलीच एखादी मग वर्मी शब्द बोलून त्यांच्या नाकाला चुना कसा लावते, अबोली-कानळांच्या वेण्या अन् खाज्याचे पुडे 'कुणाकडून कुणीकडे' जातात—अशा अनेक विषयांवर त्या जत्रा-बंधूंशीं चर्चा करतांना त्याचा रस गळून तुकडा पडे.

आज तर खुद्द त्याच्याच गांवचा काला होता. त्याच्या घरापासून एका हाकेच्या अंतरावर. आजच्या काल्यासाठीं त्यानें वर्गणी दिली होती. त्याच्या कुळागरांतली एक माडी काल्याच्या मांडवाला लागली होती. आज तो काल्याचा पाहुणा नव्हता, तर यजमान होता. आज तो पुढें होऊन आपल्या इष्ट-मित्रांचं स्वागत करणार होता. तात्पुरत्या गुडलांत थाटलेल्या गुणूच्या उपाहारगृहांत नेऊन खोबरेलांतलीं द्रोणभर भजीं अन् 'तूष्णीम्' दुधाचा तांबडा चहा त्यांना पाजणार होता. काल्यासाठीं म्हणूनच काल त्यानं आपल्या बहिणीला माहेरीं आणली होती. आज दुपारीं त्याची आत्याहि आली होती ती त्यासाठींच. आज पोरांबाळांनीं त्याचं घर गजबजलं होतं.

खरं म्हणजे हरीला आजचा दिवस मोकळा मिळायला हवा होता. पण त्याच्या दुर्दैवानं आजच कुळागर शिंपण्याचा 'पैरा' आला होता. अन् तोसुद्धां सकाळचा नव्हे, तर संध्याकाळचा. काला असो नाहीं तर महाकाला असो, कुळागराचं शिंपणं टाळतां येत नव्हतं. काला ही मौज होती, तर शिंपणं हें कर्तव्य होतं. पाटापासून खालीं वहाळापर्यंत उतरत गेलेला दुपाखी उभा दांडा त्यानं बराचसा भिजवून काढला होता. 'धूपं समर्पयामि' न करतां रोजच्याइतक्याच औदार्यानं त्यानं केळीं-पोफळींना आणि मिरवेलींना जलदान केलं होतं. फक्त आजचा त्याचा वेग मात्र अफाट होता. शिंपतांनाचा 'घसाघसा' आवाज सगळ्या वाडींत दुमदुमत होता.

आज पोफळींना सावकाशी सोडून घटाघटा पाणी प्यावं लागत होतं. त्यांना आकंठ झालेलं पाणी फिरून मागांत घरंगळत होतं. अर्धांगी त्याच्या मदतीला असती तर हें काम त्यानें तासभर दिवस पुढें ठेवून उरकलं असतं. पण आज ते दोन हात घरीं आलेल्या मंडळींच्या सरबराईत गुंतून पडले होते.

आतां फक्त वहाळाच्या कांठचे चार माग शिंपायचे उरले होते. पण तेंच काम चेंगट झालं होतं. कारण, वरच्या तळ्यांतलं पाणी संपत आलं होतं आणि त्यामुळं त्याचा वेगहि मंदावला होता. नेहमींचीच ही रड; पण आज त्याला ती असह्यपणें जाणवत होती. एका मागाला पाणी लावून तो केव्हां भरतो याची प्रतीक्षा करीत तो कलें आडवं टाकून त्यावर बसला होता.

पलिकडच्या वायंगणांतल्या मोठ्या मेरेवरून खाजेवाले, माळणी, वतारी, टिंवटी देवळाकडे आपले मांड मांडण्यासाठीं जात असलेले त्याला दिसत होते. थोडयाच वेळानं मोचेमाडकर नाटकीहि त्याच मार्गानं देवळाची मोहर धरणार होते. त्यांच्या मागून त्यांच्या पोषाखाचे पेटारेहि जाणार होते. खरं म्हणजे हरीला या वेळीं देवळाजवळ हजर व्हायला हवं होतं.

पुन्हा त्यानें मागाकडे पाहिलं. पण अजून तो भरला नव्हता. पाणी मधल्या फोंड्यांत घोटाळत होतं अन् मोठ्या जिकिरीनं पुढें सरकत होतं. ‘ मर रांडेच्या ! ’ म्हणून त्यानें त्या दुबळ्या जळाला एक गाळ घातली आणि पुन्हां तो वायंगणांतल्या वाटेकडे डोळे लावून बसला.

पण दूरचं पाहण्यांत गढलेल्या हरीला जवळच्याची चाहूल लागली नाहीं. कमळजा भुईचांफ्यासारखी नकळत आपल्या मागें उगवली आहे हें त्याला तिच्या कांकणांचा आवाज होईपर्यंत उमगलं नाहीं. मग मात्र तो एकदम तोंड फिरवून तिला सन्मुख झाला.

कमळजा दांड्यावर उभी होती. तिच्या डाव्या अंगाला दोन हात उंचीवरून पाण्याचा ओझर ओतत होता आणि उजव्या अंगाला एका केळीचं हिरवंगार पान हळुवारपणें तिच्या गळ्याला गुदगुल्या करीत होतं. ती अव्यवस्थित नव्हे, तर भांग-टिळा करून कुळागरांत अवतरली होती.

नुकत्याच विंचरलेल्या तिच्या कुरळ्या केसांचे निम्नोन्नत भाग नुसते तिक्तिक् करीत होते. खालीं आधाराला बकुळीची तिपेडी माळ अन् वर अबोलीची ताजी वेणी यांमुळें तिचा केशभार तर सालंकृत झालाच होता अन् शिवाय तिच्या केतकी मुखमंडळाला एक आगळंच सौंदर्य आलं होतं. हरीला कमळजा मोठी आकर्षक अन् भरदार वाटली. तिच्या शेजारच्या केळीसारखीच. ती आतां पसवायला आली होती अन् कमळजेलाहि चौथा-पांचवा महिना चालू होता.

" एवढ्यांत झाली वाटतं काल्याला जायची तयारी ? मोठी भाग्याची आहेस. नाहीं तर आम्ही ! रखडतों आहों दुपारपासून कुळागरांत. अजून चार माग शिंपायचे आहेत अन् पाणी तर अदावतीला लागलं आहे जसं."

पण कमळजेनें ओठ हालवले नाहींत अन् गालांवरची खळीहि दाखवली नाहीं. ती नुसती मलूल डोळ्यांनीं हरीकडे पहात राहिली. हरीच्या तें लक्षांत आलं नाहीं. तिला आणखी खुलवावं म्हणून तो पुन्हा बोलूं लागला.

" आज काल्यांत तुला सगळ्या बायकांच्या पुढें नेऊन बसवतों. आपल्या गांवचा काला आहे. कुणाची टाप लागली नाहीं बोलायची ! म्हणजे तुला नाटक चांगलं दिसेल. चांगलं ऐकतांहि येईल. काय समजलं ? मात्र एक अट आहे. नाटकांतलं एखादं पद उद्यां तुझ्या गळ्यांतून निघालं पाहिजे. बघतेस काय अशी वेंधळ्यासारखी ? अग, आईच्या देखत नव्हे, पुढच्या पैऱ्याला कुळागर शिंपतांना. तुझा गळा मोठा छान आहे."

तो इतकं बोलला तरी कमळजेची मौन्यमुद्रा सुटली नाहीं. तिच्या डोळ्यांच्या कडा मात्र पाणावल्या. हरीला तें चमत्कारिक वाटलं. तो उठला. तिला जवळ झाला. सांत्वनाच्या शब्दांत त्यानें तिला विचारलं.

" काय झालं तुला ? अशी रडवेली कां ? "

" मी काल्याला येणार नाहीं. "

" येणार नाहींस ? कां ? "

" सासूबाई धाडीत नाहींत. "

एवढंच बोलतांना तिला वाटलं, कीं आपले डोळे आतां गालांव

अभिषेक करणार. केळीच्या पानाशीं कानगोष्टी करणारा आपला पदर तिनें चट्कन् उचलला आणि आपले डोळे पाझरायच्या आधींच टिपले. ती आणखी कांहीं बोलणार होती कीं काय न कळे; पण एवढ्यांत घराकडून तिच्या सासूची साद सणाणली. वरच्या ओट्यावर ठेवलेलीं रात्रीच्या जेवणासाठीं केळीचीं पानं, दुमडलेल्या कोपरांत आवळून ती तिथून पसार झाली.

" आई म्हणजे चक्रमूच आहे. गांवची जत्रा अन् सुनेला धाडीत नाहीं म्हणजे ! हिची मुलगी जाणार, नणंद जाणार, त्यांची पोरावळ जाणार अन् हिनंच काय पाप केलं आहे ! गेल्या वर्षीं तर पाठवलं होतं अन् यंदाच काय झालं ?..."

खरंच काय झालं तें त्याला काढून घ्यायला हवं होतं; पण त्यासाठीं सीधा मार्ग निरुपयोगी होता. घरीं येऊन कर्ले खोपींत आपटीपर्यंत कोणत्या द्राविडी प्राणायामानें आईच्या अंतरंगाचा ठाव घ्यावा याची त्यानें विचक्षणा केली होती.

" काय ग आई ! रात्रीं तूं एकटी कशी राहणार घरांत ? वाड्यावरची एखादी म्हातारी तुझ्या सोबतीला येते का पाहतों. "

आई पडवीवर कोंडाळं करून जेवायला बसलेल्या बाळ-गोपाळांच्या पानांत आटवल वाढीत होती. तिनें पळीवरची नजर हरीवर रोखली अन् स्पष्ट शब्दांत त्याला उत्तर दिलं.

" मला सोबत नको. कमळजा आहे घरांत. "

" असं होय ? मग ठीक आहे. बाकी तिला पाठवली असतीस तर एकापरी बरं झालं असतं. कारण अक्का अन् आत्या आल्या आहेत नाटक पाहायला. पण हीं मुलं त्यांना त्रास देतील. ही असली तर त्यांना सांभाळील. "

" तें सगळं ठाऊक आहे मला. ज्या गोष्टी आपल्याला कळत नाहींत त्यांत उगाच लुडबुड करूं नये. ती म्होरी गाय अजून गोठ्यांत आली नाहीं; तिला बघ जरा. "

आईनें तो विषय एकदम तोडून टाकला. त्याच वेळीं त्यानें कमळजेकडे

पाहिलं. ती 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति' अशा निर्विकार मुद्रेनें घरांत वावरत होती. त्याला वाटलं, हिनं मघाशी कुळागरांत माझ्यापुढें आसवं गाळलींन् तीं सासूपुढं गाळलीं असतीं तर—नसला उल्हास तर बस म्हणावं घरीं...'

रात्रीं जेवण झाल्यावर त्यानें आपला ठराविक पोषाख केला, एक मोठीशी चुडणी पेटवली अन् त्या प्रकाशांत आत्या अन् बहीण यांना त्यांच्या गोळांगुळासह सांतेरीच्या देवळापुढें आणलं. त्या दोघींना योग्य जागीं बसवून अन् पोरांचे खिसे चण्याफुटाण्यांनीं भरून तो स्वतः मोकळा झाला.

त्याचे समवयाचे शेजारी आपापलीं अर्धांगं सांभाळीत अंधारांतून प्रकाशांत येऊं लागले. त्या तरुण शेजारणी एका ठिकाणीं बसून हसूं, खिदळूं लागल्या. त्यांचे 'हे' त्यांना वेण्याफुलांनीं शृंगारूं लागले. बसल्या जागीं त्यांना मिठाईचे पुडे चालत येऊं लागले आरसे, फण्या, पिना, असल्या वस्तू या हातांतून त्या हातांत खेळूं लागल्या. काम नव्हतं, ओढ नव्हती, आवडत्या माणसासाठीं चार पैशांचा खर्च नव्हता तो फक्त हरीला.

त्या दिवशीं तो कुणाशींहि हळमळीतपणें बोलला नाहीं. मध्यरात्रीपर्यंत त्यानें उगाच इकडेतिकडे हिंडून आटेविटे काढले. सूत्रधार जेव्हां घसा खाकरीत चौफाळ्यामागें येऊन उभा राहिला, तेव्हां मात्र चटकन् पुढें घुसून त्यानें मोक्याच्या जागीं आसन ठोकलं. सूत्रधाराचं ध्रुपद तो मन लावून ऐकूं लागला. त्यानं दुगुण-चौगुण केली अन् मृदंग्यानं त्याच्याशीं झटापट मांडली तेव्हां तर तो मागचं सगळं विसरला आणि नाटकमय झाला.

**'देव गजानन रे ऽऽ वंदूं देव गजानन रे**
**सर्वारंभीं आदि जयाचें करिती चिंतन रे ऽ'**

हें सूत्रधाराचं पद संपतं न संपतं तोंच गणपति रंगभूमीवर प्रविष्ट झाला. ऋद्धिसिद्धींनीं त्याचे डावे उजवे हात संभाळले. आणि मागोमाग उघड्या अंगावर भस्मचर्चन अन् गळ्यांत काथ्याच्या दोरीचं जानवं अशा थाटांत गजाननाचे पुजारीबुवाहि दाखल झाले.

आणि हरि एकदम विस्मयचकित झाला. 'अरे, हा विश्राम!' त्याच्या तोंडून उद्गार निघाले.

विश्राम हा त्याचा आवडता नट होता. त्याचाच नव्हे; तर इतर अनेक रसिकांचा. विश्राम म्हणजे मोचेमाडकरांतला नाट्यनवरंग! तो एकटा असला तर बाकीचीं शून्यंसुद्धां भरीव वाटायचीं. प्रेक्षकांना पोटभर नाटक पाहिल्याचं समाधान मिळायचं. त्याची ती लचक, ती आवाज बदलण्याची कला, तें मानेला लागलेलं मळसूत्र, ती डोळ्यांची भिरभिर, कसलाहि प्रसंग नाट्यमय करणारी त्याची ती हजरजबाबी वाणी...छेः! विश्रामचं सगळंच कांहीं न्यारं!

चालू हंगामांत हरीनें चार-पांच नाटकं पाहिलीं होतीं; पण त्यांत विश्राम नव्हता. त्यानें त्याची चौकशी केली होती आणि महिन्याभरानें तो येणार आहे अशी माहितीहि मिळवली होती. आणि नेमका आज हरीच्या काल्यालाच तो उगवला होता. त्यामुळें हरीला अस्मान ठेंगणं झालं. मांडवाबाहेरच्या आंब्यासारखाच तोहि सर्वांगीं मोहरला.

'आतां हा गणपतीची 'यथास्थित' पूजा करील. पुढं संकासुर होऊन आला कीं, सूत्रधारासह विष्णूला चांगलाच फैलावर घेईल. पडेल, झडेल तरी खसखस पिकवील. नंतर नाटक सुरू झालं कीं हा सेवक. देवांचाहि तोच आणि दैत्यांचाहि तोच. एकदां सरळ टोपी अन् दुसऱ्यांदा तिरकी. इतर पात्रं आलीं गेलीं तरी हा आपला रंगभूमीचा मिरासदार. प्रेक्षकांत चुळबूळ सुरू झाली, आयांची जानींतानीं पोरं रडायला लागलीं कीं याचे कोटिबाज वाग्बाण सुटलेच त्या दिशेला. खरोखर आज विनोदाची चांदरात आहे.'

'छेः! आज ही असायलाच हवी होती. ती या सुखाच्या पर्वणीला मुकली. किती आनंद झाला असता तिला! माझ्यासारखीच तिलाहि नाटकाची गोडी आहे. आमच्या गांवांत वर्षांतून असा एकच दिवस उजाडतो. नाहीं तर चाललंच आहे, येरे दिवसा भर रे पोटा! पण आमची आई तरी कशी खाष्ट पहा. सुनेवर अधिकार गाजवण्याची काय ही तऱ्हा? बाकीचे तीनशें एकुणसाठ दिवस आहेतच कीं, म्हणावं. तरुण मंडळींचे हौसेमौजेचे चार दिवस असतात हें हिला कळूं नये!'

'तें कांहीं नाहीं. तिला आज काल्याला आणलंच पाहिजे. हळूच जातों अन् खोलीच्या खिडकींतून ही वेताची छडी घालून तिला ढोसतों.

ती लगेच जागी होईल, आवाज न करतां दार उघडील, कीं धूम ठोकायची तिथून. आई झोपली असेल माजघरांत. तिला खबर लागेल ती सकाळीं. पण सकाळचं सकाळीं पाहूं...'

हरि आपल्या जागेवरून उठला. मागच्या उभ्या गर्दीतून मुसंडी मारून मांडवाबाहेर पडला. लगेच घरच्या वाटेला लागला. अंधार त्याला अडवूं शकला नाहीं. थंडी अन् दंव त्याला गारठवूं शकलं नाहीं. उताराखालचा सुका वहाळ त्यानं ओलांडला. पुढची वाट काजूंच्या झाडांखालून जात होती. तो मधेंच चालत होता, मधेंच धांवत होता. त्याचे कान होते काल्याच्या मांडवाकडे अन् डोळे घराकडे. देऊळ अन् घर यांच्यामधली ती दहा मिनिटांची वाट. मधें आणखी एक पावसाळी वोहळाचा चर.

हरि तिथें पोंचायला, चरावरून त्याची उडी पुढें पडायला आणि कुणाची तरी किंकाळी उठायला एकच गांठ पडली. कुणी तरी जवळच्या काजूच्या झाडाला घट्ट बिलगलं. हरीहि एकदम दचकलाच. पण धीर धरून त्यानें खिशांतली दीपिका बाहेर काढली अन् त्या बाजूला प्रकाशाचा झोत टाकला. कोण होतं तें? दुसरं कोण? हरीचंच दुसरं हृदय. त्याचाच बहिश्चर प्राण!

कमळजेनें आपल्या गोऱ्या भुजलतांनीं त्या काजूच्या मुळाला मगरमिठी घातली होती. तरीहि तिची काया भयानें थरारत होती. 'तूं का ती?' या हरीच्या प्रश्नाला ती उत्तर देऊं शकली नाहीं. तिनें नुसती ओठांच्या पाकळ्यांवरून जीभ फिरवली. हरीनें प्रथम तिची वृक्षमिठी सोडवली आणि तिला जवळ ओढलं. त्याला आतां घरीं जाण्याचं कारणच उरलं नव्हतं. त्याचं उद्दिष्ट अर्ध्या वाटेंतच सफल झालं होतं. तिचा श्वास ताळ्यावर आला अन् धपापतं उर स्थिर झालं तेव्हां त्यानें तिला विचारलं.

"कुठें निघाली होतीस तूं?"

"कुठें म्हणजे? काल्याला."

"वेडीच आहेस. भुतं आहेत, देवचार आहेत अन् वाघटंसुद्धा—"

"पण मला घरीं झोपच लागेना. सगळी लोकयात्रा डोळ्यांपुढें न्याहाळूं लागली. मृदंगाची धुमाळी कानावर आदळूं लागली. वाटलं कीं

सगळा गांव या वेळीं सुख लुटतो आहे अन् मी मात्र दुर्भागी इथं खिळून पडलें आहें. म्हणून मग केला धीर झालं–"

"आई जागी नाहीं झाली ?"

"झाल्या तर ! नाहीं कशा ? त्यांची झोप कुत्र्याची. त्यांनीं मला हाक मारली. मी भिंतोडीच्या वाटेवरच होतें. पण 'ओ'च दिली नाहीं. काय बोलतात तें ऐकावं म्हणून क्षणभर थांबलें मात्र."

"मग काय म्हणाली आई ?"

"गेली वाटतं ही ? भूत आहे नुसतं. तो आला असेल हिला न्यायला मला नकळत. चोर आहेत दोघंहि !"

हरि हंसला. कमळजाहि हसली. दोघं देवळाकडे निघालीं. कमळजेचा पाय हरीच्या पुढें. तिचं मन त्या जनसमर्दात घुसण्यासाठीं, त्या सागरांतला एक बिंदु होण्यासाठीं अधीर, उत्कंठित झालं होतं. पण हरीचं मन अजून आईचाच विचार करीत होतं.

"आणखी कांहीं म्हणाली नाहीं का ?"

"नाहीं कसं ? कांहींच्याबाहीच म्हणाल्या–एवढा नजरबंदीचा खेळ कशाला करायला हवा होता त्याला ? गेल्या वर्षीं नाहीं का पाठवली ? पण यंदा गरव्हारशी आहे म्हणून म्हटलं, नको. तीं काळींबेंद्री सोंगं अन् ते राक्षसबिक्षस पाहून पोर वेडंविद्रं जन्मलं म्हणजे–"

हरीला हा विचार एकदम नवीन होता. ऐकतांक्षणींच तो गोठला. त्याचं उचललेलं पाऊल जागच्या जागींच पडलं.

"असं म्हणाली आई !...हें नव्हतं मला ठाऊक. मग तिनें केलंन् तेंच योग्य. आतां आपल्याला मागें फिरलं पाहिजे."

"हें हो काय तुमचं ? मी नाहीं मागें फिरणार. माझी बहीणसुद्धां आपल्या गरव्हारपणांत काला पाहायला गेली होती. कशी सुरेख मुलगी झाली तिला. सासूबाईचं सगळंच मुलखावेगळं. आतां चला माझ्याबरोबर मांडवांत. किती गरव्हारशा तिथं बसल्या आहेत त्या दाखवतें तुम्हांला –"

"असतील. पण आपल्याला आई सांगेल तें प्रमाण. निदान या बाबतींत तरी. आपल्या घरीं पहिलं-वहिलं बाळ होणार आहे. तें कसं सुरेख नक्षत्रासारखं झालं पाहिजे. मुलापेक्षां काला अधिक नव्हे."

" तुम्हांला काय जातं सांगायला ! तुम्ही गांवोगांव भटकतां. माझ्या वांट्याला वर्षोतून ही एकच रात्र – "

कमळजेचा शब्द कांपरा येत होता. कदाचित् तिचे डोळेहि भरले असावेत; पण अंधारांत हरीला ते दिसले नाहींत. कांहीं झालं तरी तो आतां तिला पुढें न्यायला तयार नव्हता. तो घट्ट उभा राहिला होता अन् ती त्याला परोपरीनें गळ घालीत होती--

" समजलं का ? मी संकासुर पाहणार नाहीं. तो आला कीं डोळे गच्च मिटून घेईन. राक्षसाकडे पाठ करीन. चांगलीं असतील तेवढींच सोंगं पाहीन. मग तर झालं ? अं ? "

" असं कधीं झालं आहे ? छेः नकोच तें. मी तुला घरीं पोंचवतों. "

कमळजेनें त्याच्या हातांतून आपला हात झटकला अन् रागानें त्याला म्हटलं.

" मला घरीं पोंचवा अन् तुम्ही तेवढी चैन करा. सगळं येतं तें बायकांच्या पाठीशीं. पुरुष सदा सुटके. सदा असिवार... "

कमळजेनें झिंजुडलेला हात हरीनं पुन्हां हातीं घेतला अन् तिच्या न दिसणाऱ्या मुखाकडे भावभरी दृष्टि लावून तो बोलला.

" असं कसं म्हणतेस ? बाळ तुला होणार आहे. माझ्यापेक्षां तुला अधिक सुख देणार आहे. तूं त्याची आई आहेस. दुर्दैवानें माझी आई म्हणते तसं कांहीं झालं तर ? होणार नाहीं हें मला पटतं. पण झालं तर–कोणत्या वेळेवर आईच्या तोंडून ती ' अवसरणी ' निघाली असेल तें कोण सांगणार ? मग किती दुःख होईल तुला ! बाळ मोठा झाला अन् तुला म्हणाला–' तूं एका रात्रीचं सुख भोगलंस; पण मला मात्र जन्माचं वेडंविद्रं करून ठेवलंस ! ' तर काय उत्तर सांगशील तूं त्याला ? "

आतां मात्र कमळजेचं काळीज चरकलं. तिच्यांतली माता जागृत झाली. ' नका पुढं बोलूं. मला तें नाटक नको. मी घरीं जातें. मला पोंचवा. '

" किती शहाणी आहेस तूं ! मी तुला घरीं पोंचवतों अन् मी पण घरींच राहतों. जो आनंद तुला मिळूं शकत नाहीं तो स्वतः भोगतांना

मला आतां गोड वाटायचं नाहीं. पुढें येणाऱ्या बाळानें आतां आपल्या सुखदु:खांची गांठ पक्की करून टाकली आहे. ”

हरि तिला हातीं धरून चालवूं लागला. पत्नी म्हणूनच नव्हे; तर आपल्या वंशाच्या अंकुराची जननी म्हणूनहि तो तिला खाचखळग्यांतून सांभाळून नेत होता. चालतां चालतां कमळजेनें हरीच्या खांद्यावर आपलं मस्तक टेकलं. तिच्यासह दोन जिवांचा भार त्याच्या अंगावर आला. तिला आज हरि एकदम निराळा वाटला. त्याच्या स्पर्शांत, श्वासांत, वाणींत तिला एक नवी सहानुभूति भेटली. आजवरच्या मुक्तछंद, बेदरकार हरीपेक्षां या क्षणींचा हरि भिन्न होता. मनानं, आत्म्यानंसुद्धां किती जवळ आला होता तो तिच्या ! आणि हें परिवर्तन कुणीं घडवून आणलं होतं ? तिच्या उदरांत चुळबुळूं लागलेल्या त्या अज्ञात, अनोळखी जीवानें. ती स्वतःशींच म्हणाली, ‘ जळो तें नाटक ! या क्षणीं मी जें भोगीत आहें, त्याच्या शतांश तरी सुख आहे का त्याच्यांत... ! ’

आभाळांतलीं ग्रहनक्षत्रं लुकलुकत्या नजरेनें त्या एकजीव झालेल्या दंपतीला पाहून आपसांत बोललीं— ‘ देवळापुढें चाललेल्या नाटकापेक्षां हें नाटक अधिक ‘ समाराधन ’ आहे. अधिक भावरम्य आहे. सुख-पर्यवसायी आहे. हीं दोन पात्रं चार भिंतींच्या जवनिकेंत आड होईपर्यंत आपण यांनाच पाहूं. यांच्यावरच कौतुकाचीं लाह्या-फुलं उधळूं. ’

घर नजीक येतांच हरि कमळजेचं मस्तक वर उचलीत तिला म्हणाला. “ आईनें विचारलं तर पाटावर गेलें होतें म्हणून सांग. ”

“ अन् तुम्ही काय सांगाल ? ”

“ मी सांगेन कीं आज दिवसभराच्या कामामुळं मी थकून गेलों, डोळे मिटूं लागले अन् म्हणून परत आलों. ”

“ पण सासूबाई कांहीं इतक्या दुधखुळ्या नाहींत ! त्या काय समजायचं तें समजून आंतल्या आंत पुटपुटतील— ”

“ काय ? ”

“ चोर आहेत दोघंहि ! ”

# अनुभव भेटे–

त्या लग्नमंडपांत वराची मधुपर्कपूजा एका विशिष्ट उपचारावर येतांच उपाध्यानें ज्येष्ठमानाची सूचना केली. नरहरीहून ज्येष्ठ असलेल्या जांवयांसाठीं एक सबंध शेंद्री सोडण्यांत आली. एक, दोन, तीन पुरुष मध्यें एकेका माणसाची जागा सोडून शेंद्रीवर विराजमान झाले. पाठोपाठ तीन नारीरत्नें गजगतीनें पुढें येऊन आपापल्या 'माणसा'च्या डाव्या हाताला खालच्या मानेनें आसनस्थ झालीं. उपाध्या थट्टेनें म्हणाला, 'ब्रह्मा–विष्णु–महेश!'

त्याला बिचाऱ्याला काय ठाऊक; कीं ते पुढें नरहरीच्या वांट्याला राहु–केतु–शनि ठरणार आहेत म्हणून!

अंगणापेक्षां पुरुषभर उंच असलेल्या पडवीवर एका खांबलीला टेकून बसलेल्या राधेमामीनें आपल्या तिन्ही जांवयांना दुसऱ्याच्या हातीं अहेर करवला आणि बसल्या जागेवरून त्यांचें कौतुक पाहिलें. तिच्या सुकलेल्या ओठांवर उगवलेलें स्मित बराच वेळ तसेंच साकळून राहिलें. आपल्या नव्या जांवयाचा मुखडाहि तिनें न्याहाळून घेतला पण त्या न्याहाळणींत तिला समाधान होण्याजोगें, कौतुक करण्याजोगें कांहीं गवसलें नाहीं. आपली बाबी सावळी असली तरी तिचा नवरा तिच्याहून काळेपणांत सरस असावा हें तिला बरें वाटलें नाही. पण ती स्वतःच त्याची निवड करून चुकली होती; तेव्हां आतां कोणाला बोल लावणार!

नरहरीहि अधूनमधून तिच्याकडे पहात होता. काळ्या, सुरकुतलेल्या गालांची, वरच्या उजव्या ओठावर नाकपुडीच्या शेजारीं फुगलेल्या गोचिडीएवढा काळाकुट्ट चामखीळ असलेली अन् डोळ्यांत तलवारीचें पातें असलेली ती सासू नरहरीलासुद्धां मुळींच आवडली नाहीं.

सासू न आवडो; पण तिची त्याला देऊं केलेली मुलगी! पण तिला अजून नरहरीनें कुठें पाहिलें होतें! ती अजून त्याच्या वांट्याला 'सोडत'च

होती. आणि ती केव्हां फुटेल यासाठीं तो उतावीळ झाला होता. थोड्याच वेळांत अंतरपाट दूर झाला. माळ घेतलेले बाबीचे दोन हात उंचावले. त्याबरोबरच मुखचंद्रहि वर झाला. आणि नरहरीनें आपली माळ तिच्या गळ्यांत घालतांना मनांत म्हटलें, 'आहे. ठीक आहे. सासूची छोटी प्रतिमा असली तरी ओठावर चामखीळ नाहीं.'

बाबीच्या कन्यादानाचें पुण्य एका दूरच्या नातेवाईक दांपत्यानें उपटलें. तीन कन्यादानें लागोपाठ राधेमामीनें नवऱ्याच्या हाताला हात लावून केलीं होतीं; पण चवथीच्या–लाडक्या बाबीच्या–बाबतींत दैवानें तें पुण्य तिला घेऊं दिलें नाहीं. खांबलीशीं टेकून बसलेली असतांना याच विचारानें तिच्या डोळ्यांत पाणी भरलें. ते धारदार डोळे करुणास्पद झाले.

राधेमामीला ओळीनें या चारी मुलीच झाल्या होत्या. पहिल्या वेळीं तिला आनंद झाला होता. तिनें म्हटलें होतें, 'पहिली बेटी तूप-रोटी.' पुढें मुलगा होईल त्याला खेळवायला आधीं आक्काबाई आल्या हें बरंच झालं.' दुसऱ्या खेपेला ती खट्टू झाली होती; पण तिनें आपला विषाद मुद्रेवर दिसूं दिला नव्हता. तिसऱ्या खेपेला डोहाळे जरा चमत्कारिक लागले तेव्हां तिनें मनांत गांठ बांधली होती कीं, आतां मात्र नक्की मुलगा! पण विधाता थोडक्यासाठीं चुकला होता आणि त्यानें राधेमामीला अश्रूंनीं पदर भिजवायला लावलें होतें.

ती मग इतकी वैतागली होती, कीं आतां चौथी खेपच नको. पण दैवानें तिचा निषेध मानला नव्हता त्यानें चौथी खेप बळेंबळें तिच्यावर लादली होती आणि तिच्या उरांत धस्स् झालें होतें! 'आतां नेमका मुलगा व्हायचा. तीन मुलींवर मुलगा म्हणजे तिखळा, अपशकुनी, घरबुडव्या. जगला-वांचला तर पुढें मुलगी द्यायलासुद्धां कुणी तयार व्हायचं नाहीं. नको रे देवा! तुला लक्ष वात लावीन. या खेपेस मुलगा नकोच!'

आणि देवानें तिची कींव–काकुळती ऐकली होती अन् बाब्याच्याऐवजीं ही बाबी जन्माला घातली होती. दुःखांतलें सुख म्हणतात तें राधेमामीला झालें होतें. वरच्या तिन्ही कन्यारत्नांवर वेळीं-अवेळीं राग काढून त्यांना धोपटणारी राधेमामी बाबीच्या बाबतींत अति हळुवार, मेणाहून मऊ बनली

होती. इतर मुलींपेक्षां बाबी तिच्या चेहऱ्यामोहऱ्याला अधिक मिळतीजुळती होती. त्यामुळेंहि तिच्या वात्सल्यांत आधिक जिव्हाळा आला होता.

बाबीला तिनें सगळ्या बाबतींत चढवून ठेवलें होतें. खायला, प्यायला, ल्यायला, तिघींपेक्षांहि नाजुकसाजूक देऊन तिची ' अपुर्बाय ' केली होती. तळहातावरच्या फोडासारखी तिला वाढवली होती आणि वेडीहि करून ठेवली होती. यथाक्रम तिघींचींहि लग्नें झालीं, घरांत जांवयांचा पायरव सुरू झाला, तरी बाबीला उजवण्याची—आपल्यापासून तिला दूर करण्याची कल्पनाच तिला सहन होत नव्हती. आणि या तिच्या मुलखावेगळ्या मायेंतूनच पुढें घरजांवई आणण्याचा विचार तिच्या मनांत उगवला होता.

' हो, घरजांवईच आणावा. दोन्ही दृष्टींनीं तें सोईचं होईल. बाबी याच घरांत राहील. आपल्या डोळ्यांखालीं, आपल्या पंखांखालीं. मुलीला माझी माया आहे. ती आईवेडी आहे. दूर केली तर मासोळीसारखी तडफडेल. अन् ती गेली तर मी तरी जगूं कशी ? या एवढया मोठ्या घरांत मला कोण मग ? माझं दुखलंखुपलं कोण पाहील ? उद्यां अंथरुणावर पडलें तर मला पाटाचा तांब्या भरून कोण आणून देईल ? शिवाय कुळागराचं काय करायचं ? शेताची व्यवस्था काय ? गुरं-वांसरं कोण पाहील ? चार माणसांचं अविच्छिन्न पोट आहे इथें. कोण येईल तो कसून खाईल अन् आम्हां दोघांनाहि संभाळील. मरायच्या आधीं सगळं त्याच्या नांवावर करून टाकलं कीं घर वसतं राहील... '

हा विचार रुजला अन् ठाम झाला तशी ती आपल्या चोखंदळ दृष्टीनें मुलगे हेरूं लागली. ' बाबीला हा शोभेल का तो साजेल ? ' हुषार, सुंदर प्रतिष्ठित घराण्यांतल्या कित्येक मुलांवर तिचा डोळा होता. पण त्यांपैकीं कोणीहि तिला बधला नाहीं. राधेमामीचे घरजांवई होऊन तिच्या घरीं तुकडे मोडायला ते कांहीं नामर्द नव्हते. हेरलेल्या स्थळांनीं अशी निराशा पदरीं घातल्यावर अखेर तिला मनाजोगा नसूनहि नरहरि पसंत करावा लागला. बाबीला चांगला नवरा मिळविणें यापेक्षांहि, काय वाटेल तें होवो; पण बाबी घरीं राहो, हा तिचा मुख्य मुद्दा असल्यामुळें राधेमामीनें ही कोयनेलची गोळी डोळे मिटून गिळली.

नरहरि घरचा गरीब असो, काळा असो, अबोल असो; पण त्याच्या अंगीं दुर्गुणांची वस्ती नव्हती. तो कष्टाळु होता आणि त्यासाठीं लागणारें शरीरबळ त्याच्यापाशीं भरपूर होतें. त्याचें गोटीबंद शरीर दृष्ट लागण्याजोगें होतें. पांच मणांचें सुपारीचें पोतें पाठीला लावून कच्‌दिशी तो उचलूं शकत असे. घरीं दोन वेळां पोटभर अन्न मिळण्याची मारामार; तिथें दूधतूप कुठलें ? पण देवानें त्याला गर्भांतच सगळे पौष्टिक पदार्थ पाजून जन्माला घातलें होतें. घरजांवई होण्यांत आपलें दैन्य फिटेल एवढ्याच एका कारणासाठीं तो त्या गोष्टीला राजी झाला होता. त्यानें मुलगीसुद्धां पाहिली नव्हती. राधेमामीच त्याच्या घरीं येऊन त्याला पाहून गेली होती. शेतवाडी किती आहे, मुलगी दमेकरी वगैरे नाहीं ना, एवढ्या गोष्टी त्याच्या थोरल्या भावानें येऊन पाहून घेतल्या होत्या. घर सोडून जाणें आणि लग्नाला उभें राहणें एवढेंच त्याच्या वांट्याचें काम होतें आणि तो तें आतां करीत होता.

वरात निघायच्या वेळीं बाबी 'सुंक् सुंक्' करूं लागली. नरहरीच्या उपरण्याला तिच्या पिवळ्या अष्टपुत्रीची गांठ बसली होती तरी तिला ओढ देऊन ती माउलीच्या कमरेला बिलगली. राधेमामीचें काळीज गलबललें. बाबीच्या कोऱ्या चोळीच्या पाठीवरून आपला मायाळु हात फिरवीत राधेमामी म्हणाली. 'नको रडूं माझ्या सोन्या ! अग, वरात कुठें लांब जात नाहीं तुझी. एक घर टाकून पलीकडे भाव्यांच्या घरीं तर जाती आहेस. उद्यां सकाळीं परत अन् मग इथेंच. अं !'

दुसऱ्या दिवशीं मांडवपरतणें झालें अन् समारंभाची 'दाली' वाजली. नातेवाईक ओसरले. त्रिमूर्ति जांवई जाण्याच्या तयारीला लागले. लाडूनेवऱ्यांचे पुडे त्यांच्या पुढ्यांत आले. राधेमामी ते जातांना पुन्हां एकदां रडली—विशेषत: मधला जांवई जातांना. तिन्ही तिचेच जांवई. सगळेच मुलींचे सौभाग्यसूर्य. पण त्यांतहि तिनें प्रतवारी लावली होती. मधला सगळ्यांत आवडता. गळ्यांतला तन्मणीच जणूं. तिचीं प्रापंचिक हितगुजें त्याच्याजवळ चालायचीं. तो राधेमामींचा लोभ अन् संपत्ति लाटण्यासाठीं जवळून आणि दुरूनहि जिव्हाळा, अगत्य दाखवायचा.

म्हणून राधेमामी त्याला 'सोनचांफा' म्हणे. कुठेंहि फुलला तरी

सुवास धावत, दरवळत घरीं येतो आहे. पहिल्या जांवयाला ती 'गुलाब' म्हणे. गुलाबाला मधुर सुवास असतो; पण नाकाशीं धरला तरच तो कळायचा. तिसऱ्याला तिनें 'केवडा' हें नांव दिलें होतें. वासाचा खरा; पण कणसालासुद्धा कांटे.

सगळे जामात आपापल्या धर्मपत्नींसह निघून गेले, तेव्हां नरहरीलाहि वाटलें कीं आपणहि एकदां सपत्नीक घरीं जाऊन यावें. नवी पत्नी, नवा पोशाख, नवा रुबाब घेऊन. घरजांवई असलों म्हणून काय झालं? चार दिवस बायकोला आपलं घर, आपलं सासर दाखवून आणायला कोणती हरकत!

पण त्याची नसली तरी राधेमामीची हरकत होती. तिनें त्याच्या विचाराला नाट लावला. 'आमच्या मुलीला नाहीं हो एवढी दोन कोसांची वाट झेपायची! जसे कांहीं पालखी-मेणे घेऊन आले आहेत! बाबीला सकाळीं लोणी-दशमी लागते. दुपारीं भातावर अदमुरं दही. तुम्ही काय घालणार आहांत तिला 'लाटफळं'?...'

नरहरि गरीब होता म्हणूनच राधेमामीचा घरजांवई झाला होता. तिनें त्याचें एवढें उणेंदुणें काढून त्याला हिणवायला नको होतें. ही चामखीळ-वाली, धव्या केसांची काळी महामाया पहिल्याच खेपेला असा चावरेपणा कसा करूं शकली याचें त्याला आश्चर्य वाटलें. पण खरोखरी त्यांत नवल नव्हतें. ती सासू होती. जांवयाच्या रूपानें तिनें आपल्या घराला एक पुल्लिंगी 'सून'च आणली होती. आणि सुनेला सासूनें फणकारा दाखवायचा नाहीं, तर आणखी कोणाला?

नरहरीला वाटलें, आपण लग्न केलें आहे, नवरे झालों आहों; पण जिचा देवाब्राह्मणांसमक्ष हात धरला, तिच्यावर कांहीं आपली सत्ता नाहीं. इथें आपला दाम खोटा आहे! त्यानें बाबीकडे एकवार नजर टाकली; पण तिथें राधेमामीच्या बोलण्याची कसलीच दखलगिरी नव्हती. ती तिखट-मीठ नि कैरी यांत निमग्न होती. नरहरीनें एक सुस्कारा सोडला नि तो तिथून दूर झाला.

त्याचें दुबळें जांवईपण आठ दिवसांत संपलें! कधीं कुदळ, कधीं

कुऱ्हाड, कधीं नांगर, हीं औतें त्याच्या हातांत दिसूं लागलीं. सकाळीं काम, दुपारीं काम अन् संध्याकाळींहि कामच ! त्याला वाटे, ‘ काम काय आपण हवं तेवढं करूं. पण घरांतून थोडी तरी मदत कां होऊं नये आपल्याला ? बायकोला कुऱ्हाड घेऊन लांकडं फोडतां येणार नाहींत हें कबूल; पण फोडलेलीं अवतींभवतीं फिरून गोळा करायला काय हरकत आहे ? मीं डोक्यावरून आणलेलीं कवळं हलक्या हातांनीं कुणग्यांत पसरायला काय हरकत आहे ? अन् गोठा शाकारतांना चार चुडतं वर फेकलींन् तर कितीसे श्रम होणार आहेत तिला ? ही नुसती खातेपिते, लोळते अन् लोळण्याचा कंटाळा आला कीं शेजारीं जाऊन फरामारा खेळत बसते ! हें काय चांगलं आहे ? तिला एकदां सांगितलं पाहिजे, आळस पोसतेस ती माझे श्रम जरा कमी कर कीं ! ’

संधि साधून त्यानें बाबीला तें सुनावलेंसुद्धा. पण तिनें असें मख्खपणें त्याच्याकडे बघितलें, कीं नरहरीला चमत्कारच वाटावा. ती जणूं म्हणत होती, ‘ तुम्ही काय सांगतां तें माझ्या कानामनांत शिरतच नाहीं. ’ एवढ्या-वरच ती थांबली असती तर नरहरीवर उपकार होते. पण तिनें तो नवऱ्याचा ‘ चावटपणा ’ राधेमामीच्या कानांवर घातला—‘ आई बघ ग, मला कसं सांगतात...’

राधेमामीला वाटलें, कीं आपल्या मुलीवर भयंकर अन्याय झाला. परसांतल्या झाडाच्या गोळा करून आणलेल्या काजू उभ्यानेंच रोवळींत आदळून ती फणकारली. ‘ कामासाठीं आणलं आहे तुम्हांला—तिला नव्हे ! ती या घरची मालकीण आहे. ती मांडीवर मांडी घालून बसेल अन् खाईल ! तुम्हांला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. आज तिला कामाला बोलावलंत. उद्यां... ’ आणि नरहरीनें पाठ वळवतांच तिनें जिवणी अशी काय मुरडली, कीं एखाद्याला वाटावें, राधेमामीला वाताचाच झटका आला आहे.

नरहरीला वाटलें, ‘ अजून आपण बाबीचा नवरा झालों नाहीं. अजून तिच्यावर आपली सत्ता प्रस्थापित झाली नाहीं. तो दिवस कधीं उजाडेल तो उजाडो ! ’ तो मग कामांत रमे. त्याला मनासारखें कुळागर मिळालें

होतें. मनासारखें शेतहि मिळालें होतें. आणि थोड्याच कालांत तें सगळें त्याच्या मालकीचें होणार होतें.

राधेमामी खुषींत असली कीं, एखादे दिवशीं त्याच्यावर चार प्रशंसेचीं फुलें टाकी. शेजाऱ्यांकडेहि म्हणे, ‘ कामाला वाघ आहे आमच्या बाबीचा घोव. यंदा पांच कुडवांचं वायंगण एकट्यानं नांगरलंन् ! ’ तें ऐकून नरहरि मनांत म्हणे, ‘ आपण आज एका पावलानें जवळ गेलों. ’ तो सकाळपासून मध्यान्ह कलेपर्यंत शेतांत, नाहीं तर कुळागरांत असायचा.

राधेमामीला पित्त चढे म्हणून तिनें आधीं जेवून घेतलेलें असायचें. अन् लेकीच्या मुखवटींत तूपभाताचा घास गेल्याशिवाय माउलीच्या घांटीखालीं तो कसा उतरणार ! लहर असली तर राधेमामी त्याला वाढी अन् आडवी पडली असली तर तिथूनच त्याला सांगे. ‘ पातेलींत भात आहे. विरीच्या द्रोणांत सांबारं आहे. रुख्यांत ताक आहे. घ्या वाढून अन् जेवा. ’

नरहरि म्हणे, ‘ सासू झोपली असली तर हिनें आपल्याला कां वाढूं नये ? बाबी जवळपास दिसलीच तर तो तिला ‘ शूः ’ करी. ‘ मला वाढ म्हणून हलक्या आवाजांत सांगे. पण ती बया ‘ आईक रे माझ्या—’ म्हणून तिथून विजेसारखी पसार होई— एकदम दहा झाडें आड !

ती तरी काय करील ? तें वेडें स्वतःच्या बुद्धीचें होतें थोडेंच ! तिच्या बुद्धीचें होडगें राधेमामीच्या फतेमारीला बांधलेलें होतें. तिनें बाबीला एकांतीं बजावून सांगितलें होतें, ‘ हें बघ बाबी ! त्याच्या वाऱ्यालासुद्धां उभी राहूं नको. त्याची सावली पडून घेऊं नको. तुझ्या हिताचं सांगतें तुला... ’ आणि बाबीला आईच्या हितबुद्धीबद्दल कधींच शंका नव्हती.

खरें म्हणजे त्या दोघांना संसाराला लावण्याजोगी परिस्थिति केव्हांच निर्माण झाली होती. राधेमामीनें तें आपल्या हातानें कोणी न सांगतां करायला हवें होतें. पण ती म्हणे, ‘ पोरगी आपली नाजूक. अगदींच कोवळी. होऊं दे अठरा वर्षांची. होऊं दे विसांची. काय एवढी घाई आहे ? ’

तिच्या या मताला तिच्या सगळ्या ‘ सुगंधी ’ जांवयांनींहि पुष्टि दिली होती—विशेषतः ‘ सोनचांफा ’ जांवयानें. पण मोठ्या माणसांनीं कांहींहि

ठरवलें तरी बाबीनें त्याला आडून सुरुंग लावायला काय हरकत होती? तिचीं चोरपावलें कोण तोडूं शकणार होतें? पण खरें बोलायचें तर नरहरीविषयीं तिला मुळींच आकर्षण नव्हतें. नरहरि आपला नवरा आहे, उभ्या आयुष्याचा सोबती आहे, असें तिला कधीं भावलेंच नाहीं.

तिच्या बहिणींचे यजमान घरीं आले कीं, राधेमामी त्यांचा सकौतुक सुंदर परामर्श करी. त्यांचें तसूभर उणें पडूं देत नसे. त्यांच्यासाठीं कष्टण्यांत तिला कसलें तरी अपूर्व सुखच होत असे. नरहरीबद्दल ही आस्था, हें प्रेम ती सणापरबेलासुद्धा कधीं दाखवीत नव्हती. राधेमामी त्याला गड्यासारखें वागवतांना, तुसडेपणें बोलतांना अन् उठपळ हुकूम सोडतांनाच बाबीनें पाहिलें ऐकलें होतें. ती वेळींअवेळीं इतर मुलींना दोष देई अन् त्या जांवयांचा कैवार घेई. पण बाबीच्या बाबतींत हें सगळें उलटें.

त्यामुळें बाबीला वाटे, कीं ‘ बहिणींचे नवरे हे खरे नवरे. अन् आपला? छट् ! ह्याला कोण म्हणेल नवरा? हा माझा खरा नवरा असता, तर आईनें त्याचा मान ठेवला असता. त्याचं मायेनें कोडकौतुक केलं असतं. हा नवरा नव्हेच मुळीं. अन् तो दिसला कीं लोक मला चिडवतात. ‘ जा पळ. तुझा नवरा घरीं येतो आहे. ’ मी त्यांना आतां खरळ सांगणार, ‘ उगाच माझी भलती थट्टा करूं नका...’

राधेमामीचे ते तिघेहि जांवई साखळीच्या बाजाराला आले कीं अधूनमधून सासुरवाडीला पायधूळ झाडीत. त्या तिघांमध्यें आपसांत विशेषसें सूत नव्हतें. पण नरहरीला सतावण्यांत मात्र सगळेच एका रथावर येत. ‘ नरहरि, विड्याचीं पानं खुडून आण...नरहरि, विडी वळून दे. नरहरि, पाणी तापवून दे. ’ त्याला राबवून घेण्यांत त्यांचा दावा असे तो असा—

“ केलंस म्हणून काय झालं? आमच्या सगळ्यांच्या वांट्याचं उत्पन्न तुला एकट्याला मिळणार आहे. केवळ सासूचं मन मोडूं नये म्हणून आम्ही तें तुला ओपून द्यायला तयार झालों आहों. पण तुला त्याचा कांहीं ‘ कार ’ आहे का? आजच तुझ्या कपाळाला आठ्या चढतात आम्ही आलों म्हणजे. उद्यां सासूच्या मागून तूं आम्हांला काय पुसणार आहेस? ”

खरेंच होतें तें. नरहरि मनांतल्या मनांत तसेंच म्हणे. ‘ शिंच्यांनो !

तुम्ही माझा जातांयेतां अपमान करतां. इथें पंक्तीला बसून पक्वान्नं झोडतां. तुमच्या शेजारीं मला कधीं पाट मिळायचा नाहीं ! तुम्हांला केलेल्या मधल्या वेळच्या सांज्यांत मला कधीं वांटा नाहीं. हा कोण म्हणे सोनचांफा ! तो गुलाब ! तो केवडा ! अन् मी ? मला त्या थेरडीनं ' सांतवण ' ठरवलं आहे. थांबा तुम्ही. एकदां उत्पन्न माझ्या हाताला चढूंदे. असा रस पाजतों तुम्हांला...नाहीं तुमची इकडची वाट मोडून टाकली तर ओठावर मिशी ठेवणार नाहीं ! '

पण नरहरीचें दुसरें दुःख याहून तीव्रतर होतें. उत्पन्नापेक्षांहि स्वतःच्या सांसारिक जीवनाबद्दल तो अधिक तळमळत होता. लग्नांत ' लक्ष्मीनारायण-स्वरूपिणे वराय ' म्हणून त्याची पूजा झाली होती; पण प्रत्यक्षांत लक्ष्मीचा वारासुद्धां त्याला लागला नव्हता. तो लागूं नये म्हणून राधेमामी डोळ्यांत तेल घालून जपत होती. आणि आईला परब्रह्म मानून चालणारी बाबी तिचा आदेश कटाक्षानें पाळीत होती. तिनें बाबीच्या हृदयांत नरहरी-विषयीं प्रेमाचा अंकुर उगवूंच दिला नव्हता. ती तिथें आपल्याच मायेचे मळे फुलवीत राहिली होती.

राधेमामीला नरहरि अनेक कारणांनीं अप्रिय झाला होता. पहिलें म्हणजे तो अबोल होता. दुसरें तो वेळींअवेळीं सासूची खुशामत करायला जात नव्हता. त्या कळाच त्याच्या अंगीं नव्हत्या. अन् तिसरें तो तिच्या इतर जांवयांशीं जितक्यास तितकें वागत होता. त्यामुळें तिला वाटे, हा मेला रासवळच आहे. आपल्या बाबीला अगदींच अयोग्य.

बाबीला कळो वा न कळो; तिच्या कळा मात्र दिशींमाशीं खुलूं लागल्या होत्या. आईच्या कुशींत निर्वेध झोपून सकाळीं बाहेर येणारी बाबी नरहरीला प्रत्यहीं नवी नवी दिसे कालच्याहून अधिक आकर्षक, अधिक टवटवीत वाटे. कसलेंहि ' फुलतांबळ ' तिनें माळलें तरी तें तिच्या मुखाला शोभवी कसलेंहि साधेंसुधें नवें वस्त्र नेसली तरी तें तिला खुलून दिसे.

तिच्या गतींत डौल आला होता. त्वचेवर नव्हाळी आली होती. डोळ्यांत जादूचा खेळ मांडला होता अंगप्रत्यंगांतून यौवन आंतून बाहेर फाकत होतें. त्यानें मन्मथासाठीं सिंहासन सजवून ठेवलें होतें. पण —

अजून तो अनंग मात्र कुठें रेंगाळत होता न कळे ! नरहरि त्याचीच चाहूल लागते का पाही. साधाभोळा, अशिक्षित नरहरि. पण करपल्लवी, नेत्रपल्लवी या भाषा त्याला आतां आपोआप येऊं लागल्या होत्या. पण त्याच्या बोटांच्या खुणा बाबीला कळत नसत. त्याच्या डोळ्यांतले आशय तिला उमगत नसत. त्याच्या तुटक वाक्यांतील समस्या कोणत्या उलट उत्तरानें वा अभिनयानें पूर्ण करायची तें त्या अनभिज्ञ, उदास पोरीला मुळींच आकळत नसे. नरहरीची व्यंजना तिच्या हृदयापर्यंत पोंचतच नसे. तो मग रागावे. तीहि त्याच्या दृष्टीच्या टप्प्यांतून पसार होतांना मनाशीं म्हणे–' धटिंगण मेला. मला खुणावतो आहे काय ते त्याचे दंड...केवढी ती छाती...कसलं तें दगडासारखं अंग...काय तीं हाताचीं आखूड, गाठाळ बोटं...नको ग बाई ! '

ही नापसंती राधेमामीनेंच तिच्या मनांत भरवली होती. हा दुस्वास तिनेंच तिच्या रोमरोमांत भिनवला होता. तिला वाटे, यांत आपण पोरीचें कल्याणच करीत आहों. रात्रीं झोपतांना मधल्या दाराचा आडांबा घट्ट लावून घेऊन ती शेजारीं झोपलेल्या मुलीच्या अंगावर आपला हात टाकी आणि मग बाबीला एका क्षणांत गाढ झोप लागे.

नरहरि अंगणाहून पुरुषभर उंचीच्या त्या निरुंद पडवींत रात्रभर कसा तळमळत असेल त्याची त्या म्हातारीला काय कल्पना ! ती न बोलकी थंड, जड भिंत ही त्याची सोबतीण. मायलेकी घरांत बंदिस्त आणि घरजांवई बाहेर वाऱ्यावर. रोज रात्रीं चिमणीला फुंकर घालून आडवा होतांना आशा त्याच्या कानांत गुणगुणे, आज कांहीं तरी विशेष घडणार ! तुझी थेरडी, नतद्रष्ट सासू गाढ झोपली कीं, हळूच दाराचा आडांबा निघणार. न कुरकुरतां दाराची फळी किलकिली होणार. हुंः ! अरे, बाबी झाली तरी माणूसच अन् तेंहि वयावरचं माणूस... '

तो जागा राही. गुरांची एक झोप होऊन तीं उठून उभीं राहिलीं तरी त्याचा डोळा लागत नसे. तोहि मग उठून बसे. काडी मारून कारण नसतां चिमणी लावी. फुंकर मारून पुन्हा ती विझवी आणि पुन्हा अंगावर पांघरूण ओढतांना म्हणे, ' मर शिंच्ये ! जन्मभर आईच्याच कुशींत नीज ! '

त्यानंतर दोन दिवसांनीं सोमवारचा बाजार आला. फणस, अननसें, केळीं यांची पाटी घेऊन नेहमींप्रमाणें तो साखळीला गेला. सगळा माल विकून परत घरीं यईतों त्याला दुपारचे दोन वाजले. अंगणांतून वर दृष्टि फेकतो तों पडवीवर 'सोनचांफा' जांवई बसलेला दिसला. तो एकटाच नव्हे; तर सासूसुद्धां. दोघेंहि बाबीचें कौतुक करीत होतीं अन् बाबी 'सोनचाफ्या'च्या अंगावर लोळत होती.

नरहरि तळींत बुडून थंड होऊन आला होता तरी हा प्रकार पाहून त्याचा तिळपापड झाला. रिकामी पाटी अंगणांत आदळीत तो बाबीवर खेकसला.

"ऊठ आधीं तिथून ! नाहीं तर लाथ घालतों बघ पेकाटांत. डुकरिणी-सारखं दुसऱ्याच्या अंगावर लोळायला लाज नाहीं वाटत !"

वरून दुपारची आग. पोटांत क्षोभलेला वैश्वानर. काळजांत क्रोधाचा वणवा. नरहरीच्या डोळ्यांत तांबारा आला. त्याच्या तोंडावरच्या सावळ्या त्वचेखालून तांबूस संताप बाहेर येऊं लागला. कानशिलाकडच्या शिरा हिरवट दिसूं लागल्या. त्याच्या त्या कठोर शब्दांनीं खरीखुरी लाथ बसल्यागत बाबी दूर झाली.

'सोनचांफ्या'ला तो आपला अपमान वाटला. तो बाबीला म्हणाला, 'बस ग तूं इथें. पाहूंया काय करतो तें. हा कोण एवढा टिकोजी लागून गेला आहे. !'

"काय बघणार आहेस तूं ? माझ्या एका थपडेचा तरी आहेस का ? पाणी नाहीं मागायचास एक लगावली तर." नरहरि त्याच नेटानें चार पावलें पुढें येत कडाडला.

'सोनचांफ्या'ची कढी पातळ झाली. त्याला खात्री पटली कीं हें लक्षण ठीक नाहीं. बाबीला हुंदका फुटला. ती घरांत पळाली अन् तिच्या मागून तिला समजावण्यासाठीं राधेमामी. त्या तिघांचा मांडलेला 'रस' एकदम आंबला.

'सोनचांफा' त्या दिवशीं उन्हें उतरायच्या आंतच तिथून निखळला. तो अलीकडे वारंवार येत असे तो मामूचें मन नरहरीविषयीं विटवून टाकण्या-

साठीं. तिनें आपलें उत्पन्न त्याच्या नांवावर करण्याचा विचार सोडून द्यावा हें तिला बिंबवण्यासाठीं. ‘ नरहरि अडदांड आहे. अकलेचा अमीर आहे. तो उत्पन्नाची ‘ विदवावळी ’ करील. तुला वनवास लावील. गेला उधळून तरी जाऊं दे आम्ही दोघे तुमचा प्रतिपाळ करूं अन् बाबीचासुद्धां. नाहीं तरी तिच्या नशिबांत...’

राधेमामीला नरहरीविषयीं आधींच उल्हास, त्यांतून आवडत्या जांवयाची अशी भर. आगीला वारा भेटल्यावर मग काय विचारावें ! ‘ सोनचांफा ’ सांगेल तसें वागायचें हें तिनें आतां निश्चित केलें होतें. तिचा हा कुढा भाव नरहरीला अनेकदां कळला होता. जेव्हां जेव्हां त्यानें तो विषय काढला तेव्हां तेव्हां ती चामखीळवाली, धव्या केंसांची म्हातारी अधिकाधिक टणक होत चालली आहे, याचा त्याला अनुभव येऊं लागला होता.

राधेमामीच्या वागणुकीला, बाबीच्या जडमूढपणाला, त्या घरादाराला आणि पर्यायानें आपल्या जीवनालासुद्धां तो आतां विटला होता. भवितव्या-बद्दल कसलीच शाश्वती, कसलेंच अभिवचन नसतांना आपण या घरीं घाण्याचे बैल झालों आहों ही गोष्ट आतां त्याच्या मनाला जाचूं लागली होती. अन्नावारीं राबायचें तर मग तें इथेंच कशाला ? जग कांहीं ओसाड पडलें नाहीं...

आणि त्या दिवशीं त्यानें काय तो सोक्षमोक्ष एकदां करून घ्यायचा असें ठरवून टाकलें. राधेमामीनें त्याच्याशीं बोलणें टाकलें होतें. ती घुश्श्यांतच होती, तरी नरहरि तिच्या पुढ्यांत जाऊन बसला.

“ मी तुम्हांला एक गोष्ट विचारणार आहें मला त्याचं निश्चित उत्तर हवं. ”

राधेमामीनें ओठांची लवलव दाखवली, कांहीं तरी बोलण्याची आकांक्षा दर्शविली; पण लगेच ते दाबून जिवणीला मुरड घालीत तोंड फिरविलें. जणूं तिच्यापुढें बसलेला माणूस हा कोणी तरी तिचा साता जन्मांचा दावेदार होता. पण तिनें तोंड फिरविलें म्हणून तो उठला नाहीं. त्यानें पुन्हां विचारलें, ‘ तुम्ही ठिकाण माझ्या नांवावर करणार तें केव्हां ? ’

" मुळींच करणार नाहीं. " राधेमामी बसल्या जागींच गर्रकन् फिरून मानेला हिसडा देऊन बोलली.

" तुम्ही माझ्या भावाला तसं वचन दिलं होतं. "

" वचन गेलं चुलींत. "

" ठीक आहे. निदान माझ्या बायकोचं 'झाड' धरून बसलां आहांत तें तरी सोडणार आहांत का ? "

" झाड धरायला मी काय भूतपिशाच्च आहें ? "

" साधंसुधं भूत नव्हे ! अवगत...देवगत..."

" असूं दे. तूं मला बोलूं नकोस. मी माझ्या पोरीला धरीन नाहीं तर सोडीन ! "

" मी म्हणतों, सोडाच. उपकार होतील माझ्यावर. मीं आतां इथें राहायचं नाहीं असं ठरवलं आहे. जातांना बायकोलाहि बरोबर नेणार आहें."

" मी मुळींच पाठवणार नाहीं. तुला कुठें उधळून जायचं असेल तिकडे चल. "

" अन् तिला यायचं असलं तर ? "

" तिचं अडलं आहे खेटर तुझ्याबरोबर यायला ! तिला इथें कांहीं कमी नाहीं. "

" बाकी सगळं आहे. फक्त एक नवरा तेवढा कमी पडेल. "

" गरज नाहीं तिला असल्या नवऱ्याची ! काय ग बाबे ? जाणार आहेस तूं याच्याबरोबर ? "

आणि बाबीनें जीभ आडवी घालून मुक्ताफळं काढलीं, 'मी तुला सोडून कुठे जाणार नाहीं, आई.'

" ऐकलंस ? घे. तुझ्यावांचून आमचं अडायचं नाहीं काडीइतकंसुद्धां. माझे एक सोडून तीन जांवई आहेत."

" तीनच कां ? मी आहें कीं चौथा. साधासुधा नव्हे, घरजांवई. "

" तूं रे कसला जांवई ? तूं शनि आहेस आमच्या राशीला लागलेला. तुला मी तनसडीसुद्धां देणार नाहीं या घरांतली. "

" विश्वासघाताचं फळ रौरव नरक असतं माहीत आहे ना ? "

" पडूं दे मी नरकांत पडलें तर —"

" बाकी तुमचे तिघे जांवई आहेत म्हणा ! ते येतील तुम्हांला वर काढायला ! "

" त्यांचं नांव घेऊं नकोस तूं ! "

" बरोबर आहे. नांव घेण्याच्या लायकीचे नाहींतच ते. "

" मेल्या, कां छळतोस असा मला ? कर कीं काळं इथून, नाहीं तर मीच जातें "

राधेमामी उठली अन् धुसमुसत पाय आदळीत पाटाकडे चालूं लागली. 'आई ग ऽऽ' म्हणून तिच्या पाठोपाठ वांसरूंहि धावलें. नरहरीनें दांताखालीं ओठ दाबला. त्याला त्या दोघींचाहि विलक्षण संताप आला होता. त्यानें तें घर सोडायचें निश्चित ठरवलें होतें. पण तो असा सुका जाणार नव्हता. 'तुझं माझ्याशीं लग्न झालं आहे. तूं माझी सत्तेची बायको आहेस' हें बाबीला एकदां पटवून अन् शक्य तर तिला घेऊन तो जाणार होता. आणि तशी संधि मिळेपर्यंत मात्र तिथेंच रहाणार होता.

तो खात होता, जेवीत होता; पण अस्वस्थपणें. राधेमामी त्याला आडून-उडून बोलत होती, 'कोडगा मेला. मला धाक घालतो निघून जाण्याचा. जाणार कुठें वाघाच्या बकमांत ? आहे कुठें अन्नाला आधार ! अन् गेला तर माझी गेली बलाय. राहील माझी बाबी जन्मसावित्री. कित्येक बायकांचे नवरे परागंदा होतात त्या कांहीं मरत नाहींत...''

नरहरि मनांत म्हणे, 'बोल तुला काय बोलायचं असेल तें. दोन दिवस बोलशील...फार तर चार दिवस.'

पण चार दिवससुद्धां लागले नाहीत त्या गोष्टीला. रीतीप्रमाणें पडवीवर आंथरूण टाकून तो झोपला होता. सभोंवतीं दाटलेल्या अंधारांत अन् मनाच्या अस्वस्थतेंत. आज आपल्या दैवीं कांहीं तरी अघटित, अननुभूत असें लिहिलेलें असेल याची त्याला कल्पनासुद्धां नव्हती. पण त्यानें राधेमामीचें मागच्या अंगणांत खोकणें ऐकलें अन् तो ताडकन् उठून उभा झाला.

हळूच भिंतोडीला येऊन त्यानें पाहिलें. राधेमामीची खोकड आकृति हातीं चिमणी धरून मागच्या चराकडे जात होती. नरहरि ती आणखी

थोडी दूर जाईपर्यंत थांबला अन् मग भिंतीला धरून मागील दारीं आला. दार नुसतें ओढून घेतलेलें होतें तें जरा लोटतांच उघडलें. आंत शिरून प्रथम त्यानें कडी लावून घेतली.

" आई ! ए आई ऽऽ ! " असा एक भयरुद्ध चीत्कार थोड्याच वेळांत उठला.

" चूप ओरडूं नको. मी वाघ नाहीं, राक्षस नाहीं. मला तुझ्याशीं चार गोष्टी बोलायच्या आहेत. भिऊं नकोस मुळींच. " त्या चीत्काराला दमदार, पण आश्वासक असें प्रत्युत्तर मिळालें.

आणि मग सगळें सामसूम !

अर्ध्या तासानें राधेमामीची चिमणी परत घरची वाट चालूं लागली. ती प्रथम पागोळींत आली. नंतर ओटा चढली. त्यानंतर दार लोटलें गेलें. पण तें आतां राधेमामीच्या दुबळ्या हातांना बधेना.

" पोरीनें कडी लावून घेतलीन् वाटतं. सावध आहे पोरगी. बाबी, ए बाबे ! दार उघड ग ऽ ! "

पण बाबीचीं पावलें वाजलीं नाहींत अन् दारहि उघडलें नाहीं.

" मघ्णीची झोप म्हणजे कुंभकर्णाची आहे. आतां पुढच्या दारीं जाऊनच हाकाटायला हवं. "

राधेमामी पुढच्या दारीं आली. अंगणांतून पडवीवर चढली. डाव्या अंगाला तिला अंथरूण दिसलें. पण चिमणी जरा जवळ नेतांच तिला कळलें, कीं तें अनाथ आहे. तिला त्या घटनेचा अर्थ लागला. तिच्या काळजांत धस्स झालें ! ' मेल्यानें असा दावा साधलान् ! त्याचं तळपट होवो ! '

आपण काय बोलतों, कोणाला शापतों याचा तिला त्या रागाच्या भरांत विवेक राहिला नाहीं. ती सैरभैर झाली. दार धडधडावूं लागली. जोर-जोरानें हाका मारीत सुटली, ' बाबे ! ए अवदसे ! अग, झोपलीस का मेलीस ? दार उघड ना मला. ए बाबेऽऽ ! '

आपल्या घरावर महान् अनर्थ कोसळला असें तिला वाटलें. पण तसें कांहींच झालें नव्हतें. घर शांत होतें. सुखांत होतें. कुठें आग लागली

नव्हती. कुठें भूकंप झाला नव्हता. कोणी मेलें नव्हतें. कोणी मूर्च्छितहि पडलें नव्हतें. पण तरीहि राधेमामी दार उघडण्याबद्दल आक्रोश करीत होती. ' कशी रे अशी होळ साधलीस...कसा रे माझ्या वर्मावर घाव घातलास !... ' म्हणून नरहरीच्या नांवानें ठणाणत होती.

आणि अखेर एकदाचें दार उघडलें. सगळें नव्हे तर किलकिलें. राधे-मामीच्या बहिश्चर प्राणांची आकृति चौकटींत उभी ठाकली. राधेमामीनें चिमणीच्या प्रकाशांत ' आ ' वासून तिच्याकडे पाहिलें. ती ओठ हालव-णार तों त्या आधींच बाबीचे ओठ हालले. ' आई, तूं वेडी आहेस. अगदीं वेडी. कशाला उगीच घर डोक्यावर घेतेस ? आज तूं बाहेरच झोप गुरांच्या सोबतीला. हं ऽ ! '

पाठोपाठ गोळा केलेली तिची वळकटी धप्पदिशीं तिच्या पायाशीं आदळली. बाबीचा हात मागें खेचला गेला अन् पुनश्च दाराला अडसर बसला.

' पोरीला माझ्या भारलंन् ग ऽऽ ! ' म्हणून तिनें थाड्कन् कपाळावर हात मारून घेतला. जीवनाचा तिनें आजवर अडवलेला प्रवाह तिला आडवी घालून पुढच्या मार्गाला लागला होता. आतां उद्यां ती नरहरीला कोणत्या तोंडानें ' घरांतून निघून जा ' म्हणून सांगणार होती !



# दोहींकडे धक्का !

" मी इथें येऊन शरपंजरीं पडलों आहें; एकदां येऊन भेटून जा. " तात्यांकडून हा अकल्पित निरोप माझ्याकडे आला होता. तात्या नरसोबाच्या वाडीहून परत आले, हीच बातमी आधीं मला धक्का देणारी होती. त्यांतून ते आजारी आहेत, शरपंजरीं पडले आहेत, हें तर त्याहून करुणाजनक होतं. ते आजारी पडून घरीं आले कीं घरीं येऊन अंथरुणावर पडले हें निरोप सांगणाराला विशेषसं ठाऊक नव्हतं. अर्थात् समक्ष तिथें गेल्यावांचून मला खरा प्रकार कळण्याजोगा नव्हता. त्यांनीं माझ्याशीं दुरावा धरला होता तो केवळ बाह्यात्कारी होता. त्यांचं अंतरंग कांहीं निराळंच असलं पाहिजे, असा कयास त्या निरोपावरून मी करूं शकत होतों.

—आणि म्हणूनच कार्तिकाच्या पहिल्या पंधरवड्यांत, नद्यांचे पूर शोषून घेणाऱ्या अन् चिखलाच्या अंगावर भेगा पाडणाऱ्या उन्हाची पर्वा न करतां हातावर पाणी पडतांच मी निघालों होतों. त्या दिवशीं मला परत फिरणं अशक्य होतं; पण मला त्याची फिकीर नव्हती. माणसापुढें अन् त्यांतून वडिलधाऱ्या माणसापुढें कामाधंद्याची काय पर्वा !

दोन कोस अंतर तोडून तिसरा प्रहर संपायच्या सुमारास मीं ओढा उतरून त्या गांवाच्या सीमेंत पाय ठेवला. प्रथम मला तो ' वरंडा ' दिसला. राण्यांच्या बंडांत धारातीर्थीं पडलेल्या कोण्या अज्ञात देशभक्ताच्या त्या दगडधोंड्यांच्या समाधीवर आजहि कोणी तरी झाडाचे चार ओले टहाळे मोडून वाहिलेले होते. त्यापुढें वाटेच्या दोन्ही अंगांना समोरासमोर उभे असलेले ते जुनाट फणस. उजव्या हाताच्या वाऱ्यासंगें डोलतांना पानांचें पाठपोठ दाखवणारीं तीं बांबूचीं घनदाट बेटें. त्यांच्यामधून रानाकडे जाणारी गुरांची वहाती वाट. पुढें प्रत्येकाच्या परसांतल्या रसबाळ्या केळी. कधींकाळीं कुंपणाला खुंट म्हणून पुरलेल्या आंबाड्याचं वाढून मोठं झालेलं झाड. आज त्याला लांब देठांच्या फळांचे घड लोंबत होते आणि एक

रसिक कावळा त्यांतल्या आमुरपिक्या फळाला चोंच मारून आस्वाद घेत होता.

एका काळीं हें दृश्य माझ्या खूप परिचयाचं झालं होतं. आजहि तें यथापूर्व असलेलं पाहून माझ्या अंतरांतल्या अनेक गोड स्मृती जाग्या होऊन रुमझुमूं लागल्या. याच गांवांत माझं लग्न झालं होतं. याच गांवांतल्या दोन कुंपणांच्या मधल्या वाटेनें आमची वरात निघाली होती. इथेंच माझा पहिला दिवाळसण रंगला होता. आणि पाडव्याच्या दिवशीं पक्वान्नं जेवून अहेराची आंगठी अनामिकेंत चढवून मी जेव्हां बायकोसह घरीं यायला निघालों, तेव्हां तात्या आम्हांला याच दोन फणसांपर्यंत पोंचवायला आले होते. रुप्याच्या तोड्यांनीं जड झालेलीं पावलं टाकीत माझा मागोवा घेणाऱ्या आपल्या मुलीला क्षणभर उभी करून त्यांनीं डोळ्यांत सांठवून घेतली होती. आणि तिच्या पाठीवरून हात फिरवून ‘ जा, हं ’ म्हणतांना डोळेहि ओले केले होते. आणि त्याच तात्यांनीं आज मला भेटायला बोलावलं होतं. अवघ्या दोन वाक्यांचा निरोप. ‘ मी शरपंजरीं पडलों आहें. एकदां भेटून जा ! ’

एका प्रशस्तशा घराच्या सारवलेल्या अंगणांतून पुढें होऊन मी पायऱ्या चढलों. मला वाटलं होतं कीं, तात्यांचं अंथरूण आंतल्या खोलींत कुठें तरी असेल. पण तें पडवीवरच होतं. पलीकडच्या अर्ध्या अंगाला पोफळीच्या कांबींचा वाळवीनं पोखरलेला कूड होता तेवढाच काय तो आडोसा. उशाशीं घरट, पायांशीं एकावर एक रचलेल्या ओल्या कुबट पोफळांच्या पाट्या, तिथेंच जवळ परश्यांतल्या राखेचा ढिगारा, तिथेंच उभीं करून ठेवलेलीं कांहीं जळकीं लांकडं अशा त्या परिवेषांत तात्या आपल्या रुग्ण-शय्येवर पहुडले होते. आपली शून्य दृष्टि त्या धुरकटलेल्या छपराकडे लावून.

त्यांच्या आराध्यदेवतेसारखाच ‘ दत्त ’ म्हणून मी त्यांच्यासमोर उभा राहिलों. ‘ तात्या ’ म्हणून हांक मारली. त्यांनीं आपली दृष्टि खालीं आणून माझ्याकडे लावली. मी आलों आहें, आपला जांवई आला आहे, ही संवेदना त्यांच्या मेंदूंत उमटायला कांहीं क्षण जावे लागले. मग त्यांच्या डोळ्यांत एकदम दीपराग झळकला. त्या दोन बाहुल्या हर्षानें उजळल्या. प्रयत्नानें उठून बसतांना त्यांनीं मंद, कापऱ्या आवाजांत मला म्हटलं, ‘ या. ’

मी बसलों. त्यांच्या त्या मिचकट शय्येवरच बसलों. माझ्याशीं कांहीं बोलण्याऐवजीं ते मान खालीं घालून अंथरुणावरच्या एका सुरकुतीकडे निश्चलपणें पहात राहिले. त्यांच्या अंतरांत भावनांचं उधाण आलं आहे, गतस्मृतींच्या लाटा एकमेकींवर आदळत आहेत आणि हा प्रक्षोभ, देहाबरोबरच क्षीण, जर्जर झालेल्या त्यांच्या मनाला सहन होत नाहीं असं मला वाटलं.

मग त्यांनीं पुन्हां माझ्याकडे पाहिलं. मला आपादमस्तक न्याहाळून घेतलं. ज्याला भेटायला बोलावलं तो हाच गृहस्थ अशी जणूं खात्री करून घेतली. ती झाल्यावर क्षणभर ते उत्तेजित झाले. 'तुम्ही आलांत......' एवढेच अस्फुट शब्द त्यांच्या तोंडून निघाले आणि मग कांहीं वेळ नुसतेच त्यांचे ओठ हालत राहिले. हृदयाप्रमाणें त्यांचे डोळेहि भरून आले. त्यांनीं जवळचा पंचा उचलला. बोटभर वाढलेल्या पांढऱ्या शुभ्र दाढीच्या रानांतून वाट काढीत खालीं धावणारे अश्रूंचे ओघळ त्यांना पुन्हां पुन्हां कोरडे करावे लागले. तसं करतांना मला दिसून आलं कीं, त्यांच्या हाता-बोटांना सूज आली आहे. ज्या अर्थीं हात सुजमिट झाले आहेत त्या अर्थीं पायांचीहि अवस्था तीच असणार. म्हणजे हें लक्षण कांहीं बऱ्याचं नव्हे. तात्यांनीं परलोकच्या प्रवासाचं तिकिट काढलं नसलं, तरी ते त्या बेतांत आहेत, हें नक्की.

"तात्या, काय ही तुमची दशा !" मीं कणवपूर्ण स्वरांत म्हटलं. त्यावर 'भगवान् जाणे !' अशा अर्थाचा हात हालवून त्यांनीं उशागती भिंतीला टेकून ठेवलेल्या दत्ताच्या तसबिरीकडे नजर फिरवली. मग त्यांनीं मला पहिला प्रश्न केला, तो हा.

"मुलंबाळं ठीक आहेत ना ?"

"ठीक आहेत तुमच्या आशीर्वादानें."

"माझा कसला आशीर्वाद ! आशीर्वाद त्या दत्तगुरूचा." पुन्हां त्यांची आणि दत्ताची दृष्टादृष्ट झाली.

तात्यांची दखल घ्यायला या वेळीं तरी घरात कोणी नव्हतं. त्यांचा भाऊ—त्या घराचा मालक—अन् त्यांचा मुलगा दोघेहि कुळागरांत

सुपारीचं पाडप करायला गेले असल्याचं समजलं. तात्यांची भावजय शेजारच्या घरीं पोहे कांडायला गेली असल्याचं कळलं. दोन धाकटीं मुलं पडवीवर अन् अंगणांत उनाडत होतीं. तात्यांनीं त्यांपैकीं एकाला हाक मारून म्हटलं.

" सुभद्रा माझी ही करवंटी ओतून आण ग जराशी. "

तात्यांच्या शब्दांत अशी विनवणी मी कधींच ऐकली नव्हती. ते नेहमीं हुकूम करायचे. फर्मान सोडायचे. त्याची दुसऱ्याकडून लगेच तामिलीहि व्हायची. पण आज त्यांच्या शब्दांत दम उरला नव्हता. त्या मुलीनें जिवणी मुरडली, नाकाचा शेंडा उडवला अन् ढुंगणाला पाय लावून तिथून पलायन केलं. तात्यांचं तस्त टाकायला ती त्यांची मुलगी थोडीच होती! असं आईकनाईक केल्याबद्दल तिच्यावर कोणीहि डोळे वटारणार नव्हतं.

त्या चिमुरडीनं केलेली ही तात्यांची अवज्ञा मला सुईसारखी बोंचली. एका काळीं त्या घरांत तात्यांचा शक कसा चालत होता, तें मीं माझ्या डोळ्यांनीं पाहिलं होतं. त्यांनीं नुसती भुंवई उचलली कीं पोरांनाच नव्हे; तर थोरांनाहि दचक बसायचा. आपलं कुठं चुकलं, काय चुकलं, म्हणून जो तो विचार करूं लागायचा. चार-दोन महिन्यांनीं कधीं तरी आठ पंधरा दिवस ते फोंड्याहून घरीं यायचे. ते येणार अशी कुणकुण लागली कीं सगळं घरदार तत्पर व्हायचं. लहान-थोर माणसं त्यांच्या तैनातीला उभीं रहायचीं. तात्या बसले कुठें, उठले कुठें यांकडे सर्वांचे डोळे असायचे. प्रत्येकाच्या मनींमुखीं 'तात्या' हीं दोनच अक्षरं. घर, दार, अंगण, गुरं, वासरं, सगळ्यांवर जणूं तात्यांच्या भीतीची छाया पडलेली दिसायची.

तो दरारा पोकळ नव्हता. त्याच्या मागें औदार्याचं, त्यागाचं फार मोठं बळ होतं. ते कधींहि रिक्त हस्तानं घरीं येत नसत. ते यायच्या आधीं एक गाडी येऊन अंगणाच्या मेरेला लागायची. गोणभर तांदूळ, मणभर साखर, एखादी गुळाची ढेप, कधीं भावजईला लुगडं, कधीं मुलांना कपडे, कधीं भावाला धोतर–उपरणं, असा माल ओसरीवर येऊन पडायचा. आणि पाठीमागून ही स्वारी डोक्याला रुमाल, अंगांत बाराबंदी, पुढच्या खिशांत लठ्ठशी चंची, खांद्याखालून घेतलेलं उपरणं, डाव्या भुजावर ओल्या

पंचाची घडी, अशा थाटांत वाटेंत भेटलेल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांचे मुजरे झेलीत, त्यांना क्षेमकुशल विचारीत घरीं दाखल व्हायची. आणि मग भावजईनं तोंडांतल्या तोंडांत पुटपुटायचं. ‘ अग बाई, भावजी आले ! ’ भावानें चटकन् पुढें होऊन त्यांना बसायला शेंद्री टाकायची अन् पंतोजी-समोर उभं रहाणाऱ्या आज्ञाधारक मुलासारखं त्यांचा पुढचा हुकूम ऐकण्यासाठीं तिष्ठत रहायचं.

आणि मग हा आला, तो आला, अशी भेटायला येणारांची रीघ लागायची. अमक्याला चहा दे, तमक्याला सरबत आण, याला पेहे दे, त्याला लाहीपीठ दे, असा कारखाना सुरू. ‘ अरे, मला शतावरीचीं चार झाडं आणून दे ’, ‘ बाबल्या, मला थोडीं कुडयाचीं पाळं हवीं.’, ‘ त्या झिलूला वाकेरीचं भातं मिळालं तर आणून द्यायला सांग ’ अशीं ज्याला ज्याला आज्ञापत्रं सुटायचीं. कोणाची छाती होती त्यांना नाहीं म्हणायची !

भावाच्या घरावरचा केंबळा जाऊन त्यावर कौलं पडलीं तीं तात्यांच्याच हातानं. पुढली पडवी रुंद झाली ती त्यांच्याच इच्छेनं. मोठमोठीं तांब्या-पितळेचीं भांडीं आज एक, उद्यां एक, अशीं आणून तात्यांनींच तें घर भरलं होतं. घरांतल्या कांबळी अन् शाली त्यांच्याच हातच्या. तिथल्या प्रत्येक मूल्यवान् वस्तूवर तात्यांचंच लिखित, अलिखित नांव होतं. संसारांत कसलीहि अडचण उपस्थित झाली कीं, फोंडयाकडे तोंड करून ‘ धाव पावरे गोविंदा ’ म्हणावं एवढंच भावाचं काम.

तात्या फोंडयाला वैद्यकी करीत. आसपासच्या पंचक्रोशींत त्यांची गिऱ्हाईकी होती. दत्तगुरूचें नांव घेऊन त्यांनीं रोग्याला औषधाची पुडी द्यायची. त्यांच्या बाटलींतला काळा काढा घशाखालीं घोटला नाहीं असा माणूस त्या भागांत सांपडणं कठीण होतं. त्यांनीं बऱ्यापैकीं पैसा मिळविला आणि त्यांतला पुष्कळसा भावाभरवण केला. तात्यांना मुलगा नव्हता. दोन मुली तात्यांच्या पदरांत टाकून त्यांची पत्नी परलोकीं पसार झाली होती. थोरली मुलगी बेळगांवांत एका वैद्यालाच दिली होती आणि धाकटी माझा संसार उभा करायला आली होती.

आपला बाप भावाला विकला आहे, देव संतांच्या घरीं राबला नाहीं

तितका तो भावाच्या संसारासाठीं राबतो अन् आपणांकडे दुर्लक्ष करतो, म्हणून मुली त्यांच्यावर रुसत. संधि मिळाली कीं त्यांना वारंवार छेडीत—

" आज तुमचा हात सढळ आहे म्हणून भाऊ-भावजय तुम्हांला झेलतात. उद्यां तुमचे हातपाय थकूंद्यात; याच भावानें अन् याच तुमच्या गुणाच्या भावजयीनें नाहीं तुम्हांला कांट्यावर ओढलं तर आमचं नांव दुसरं ! "

" तसं होण्यापूर्वी पूर्वेचा सूर्य पश्चिमेला उगवावा लागेल ! तळहातावर केस यावे लागतील." तात्या श्रद्धेच्या आवेशांत बोलत.

पण तात्यांची श्रद्धा भंगली आणि मुलींचं भविष्यच खरं ठरलं. पन्नाशी-च्या घरांत येतात तोंच त्यांची प्रकृति ढांसळली. त्यांच्या छातींत कलकलूं लागलं. थोडीशीच चाल झाली तरी भोवळ येऊं लागली. काढे कुटणं, रसायन खलणं, रोगी तपासायला जवळच्या गांवांतून जाणं, या गोष्टी त्यांच्या हातून होईनाशा झाल्या. शरीर त्यांना कामधंदा सोडायला सांगत होतं. सक्तीची विश्रांति देऊं पाहत होतं. त्यांनीं बरेच दिवस तशाच स्थितींत तग धरण्याचा प्रयत्न केला. पण छातींतली कलकल अन् डोक्यांतली भोवळ कमी झाली नाहीं. अखेर फोंड्याचें बिऱ्हाड उठवून ते निरुपायानें घरीं आले.

आणि त्यानंतर पंधराच दिवसांनीं मला कळलं कीं, तात्या नरसोबाच्या वाडीला निघून गेले. काय बिनसलं तें समजायला मार्ग नव्हता. एका शब्दानें मला न कळवतां त्यांनीं प्रयाण केलं याचं मला वाईट वाटलं. तात्यांचं अन् माझं नातं आतां भूतकाळांत, जमा झालं होतं. ज्या व्यक्ती-मुळें आम्ही दोघे जोडलों गेलों होतों, तो दुवा तुटला होता. पण त्या दुर्धर प्रसंगीं अन् त्यानंतरहि तात्या ज्या मायेनं माझ्याशीं वागले होते ती माया कांहीं न्यारीच होती अन् मधुरहि होती. माझा मोडलेला संसार पुनश्च उभा व्हावा, याची घाई माझ्यापेक्षां त्यांनाच अधिक झाली होती. ओळखींतल्या एका गृहस्थाला एक चांगली मुलगी आहे, असं समजतांच ते त्यांच्या घरीं जाऊन थडकले होते. ' अमक्याला मुलगी दे. बिजवर आहे म्हणून संकोचूं नको. त्या स्थळीं तिचं कल्याण होईल. माझ्यावर विश्वास ठेव. ' असं म्हणून त्यांनीं त्या गृहस्थाला जवळ जवळ खुषीची सक्ति केली होती. त्यानें ती मानली होती. ' तुम्हांला मुलगी आणली

आहे. पुढच्या महिन्यांत पहिल्या मुहूर्तावर लग्न झालं पाहिजे ' म्हणून त्यांनीं मलाहि ' हो ' म्हणायला लावलं होतं. अवचित गळून पडलेले माझे दोन हात मला पुन्हा जोडले गेले होते. त्या गरीब सज्जन वधूपित्यानें आपला शब्द खालीं पडूं दिला नाहीं, या कृतज्ञतेनें तात्या त्याला पुढें बरेच दिवस या ना त्या रीतीनें मदत करीत राहिले होते.

आणि म्हणून मला तात्यांविषयीं नेहमींच आदर वाटत राहिला होता. त्यांची मुलगी गेली; पण त्यांनीं आपलं सासरेपण, वडीलपण जाऊं दिलं नव्हतं. त्यामुळें तात्यांचं स्मरण मला अनेक प्रसंगीं होई. मी त्यांना दोन-तीन पत्रंहि पाठवलीं होतीं. पण त्यांनीं एकालाहि उत्तर न दिल्यामुळें पुढें मी तो नाद सोडला होता. आणि आज तब्बल सात वर्षांच्या कालावधी-नंतर ते मला दिसले होते. क्षीण, निःसत्त्व आणि हतबल. उपेक्षेच्या नि अवज्ञेच्या रानांत पडलेले.

भाऊ खुशाल कुळागर पाडतो आहे. भावजय निर्वेधपणें शेजारधर्म पाळते आहे. पोरं वांकुल्या दाखवून पळत आहेत. तात्यांना भांडंभर पाणी लागलं, घोटभर चहा हवासा वाटला, कांहीं तोंडांत टाकण्याची इच्छा झाली, तर कोण आहे इथें ! हा वाळवीनें कुरतडलेला कूड, हा गुडघाभर उंचीचा घरट, या कुबट सुपारीच्या पाट्या, या धुरकटलेल्या वांसे-कडण्या, हे यांचे सोबती. या वस्तू जड, अचेतन, तसेच—निदान त्या पंथाला लागलेले तात्या.

मी येतांना माझ्या परसांतल्या साखरलिंबिणीचीं दोन पिवळीं रसदार लिंबं तोडून माझ्या पंचांत बांधलीं होतीं. त्यांतलं एक सोलून मी दोन फांका उलगडून त्यांच्या हातावर ठेवल्या. त्यांनीं त्या चोखून चोखून खाल्या. निःस्वार्थ प्रेमळाच्या हातून मिळालेल्या त्या एवढ्याशा वस्तूंतला रस जणूं त्यांना निपटून शोषायचा होता. किती तरी वर्षे जणूं त्यांना ' निश्चक्र ' उपवास पडला होता. आणि आज या क्षणीं हें अकल्पित लाभलेलं पारणं ते साधून घेत होते. त्यांच्या मुद्रेवरच्या सुरकुत्यांच्या चऱ्यांत हर्षाच्या सुवर्णरेषा लकाकूं लागल्या. त्या गदूळ, पिवळट डोळ्यांतल्या बाहुल्या क्षणभर नाचल्या हेंहि मीं पाहिलं. एक फळ त्यांनीं संपवलं. दुसरं जणूं कृपणाच्या निधानासारखं उशाखालीं लपवलं. माझ्या झाडावर

लटकणाऱ्या घोसांतलीं तीं दोन फळं खरीं कृतार्थ झालीं असं मला वाटलं. मी त्यांना मग म्हटलं.

" तात्या, कशाला आलांत तुम्ही इथें? या खेडेगांवांत तुम्हांला औषधपाणी कुठून मिळणार? बेळगांवच्या जांवयाकडे कां नाहीं राहिलांत? तिथें एखाद्या चांगल्या डॉक्टरचं औषधहि मिळालं असतं अन् तुमची मुलगीच असल्यामुळें शुश्रूषाहि नीट झाली असती."

त्यावर तात्या हसले. त्या हास्याचा कडवटपणा चार दोन क्षण त्यांच्या जिवणीवर टिकून राहिला. त्यांच्या आवाजांत एक वेदनापूर्ण कारुण्य निर्माण झालं. थोड्या वेळापूर्वींचा साखर-लिंबू चोखून खातांना दिसलेला आनंद त्या करुणाजळांत बुडून अदृश्य झाला.

" मुलगी अन् जांवई...कोणी कोणाचा नव्हे बळवंतराव! नाहीं, नाहीं! चुकलों. तुम्ही समोर बसलेले असतांना तरी मला असं बोलतां कामा नये. दत्तगुरु मला पाप लावील. पण खरं सांगतों तुम्हांला. सगळीं सुखाला अन् स्वार्थाला लालचावलेलीं. सगळीं छन्‌छन् नादाचीं लुब्ध. माझा हात चालत होता तोंवर मी सगळ्यांना हवा होतों. माझ्याकडून हात ओला होईल अशी आशा होती तोंवर सगळ्यांच्या माना माझ्यापुढें लवत होत्या. सगळ्यांच्या जिभेवर साखर होती. पण ती आशा संपतांच सगळ्यांनीं तोंडं फिरवलीं. तात्या कोणाचा नव्हे, असं झालं. भावाला सोडाच; पण पोटच्या मुलीलासुद्धां माया उरली नाहीं-"

" मला तुमच्या भावाबद्दल कांहीं वाटत नाहीं तात्या, पण सिंधूबद्दल तुम्ही म्हणतां तें मात्र चमत्कारिक—"

" चमत्कारिक कसलं; मनुष्यस्वभाव आहे हा! ज्याच्यांत कांहीं अर्थ उरला नाहीं अशाची कदर कोण करणार! मी नरसोबाच्या वाडीला होतों तर महिन्याच्या महिन्याला पत्र यायचं. 'तात्या, आतां थंडीचे दिवस आले. तुम्हांला सोसायची नाहीं तिथली हवा...आतां उन्हाळा आला..... आतां पावसाळा आला...तुम्हांला माधुकरीचं, अन्नसत्रांतलं अन्न मानवायचं नाहीं. तुम्ही इकडे निघून या. कसलाहि संकोच करूं नका. तुम्ही आम्हांला कशाहि स्थितींत जड नाहीं. तुमच्या आयुष्याचे अखेरचे दिवस..."

तात्या एकदम थांबले. ती घटना ताजी होती. स्मृति ज्वलन्त होती. तिची आग त्यांच्या अस्थिपंजराला सोसली नाहीं. अंतरांत ढवळणारं विष भडाभड ओकून टाकायलाहि त्यांना ताकद नव्हती. त्यांच्या उराची शिंप खालवर होऊं लागली. मान, गळा, घामानं चिकट झाला. उष्ण निःश्वास त्यांच्या विवर्ण झालेल्या ओठांना करपवूं लागले. त्यांची जीभ थांबली तरी डोळ्यांतल्या बाहुल्या अधिक बोलक्या झाल्या. थोडा वेळ स्तब्ध राहून त्यांनीं पंचा गळ्याभोंवतीं फिरवला, अंगणांत काळवंडत चाललेल्या आंब्याच्या सावल्यांकडे नजर टाकली आणि इतिवृत्ताचा सोडलेला धागा पुन्हां पकडला.

" ......मीं सिंधूच्या नवऱ्याला पत्र लिहिलं, कीं मला येऊन घेऊन जा. तो ताबडतोब आला. मी देवाचे पाय सोडले अन् जांवयाचा आसरा घेतला. मला बघून सिंधूनें केवढा मायेचा उमाळा दाखवला ! 'तात्या, काय ही जिवाची दशा करून घेतलीत ? तुम्हांला सांगितलं होतं कोणी असे हालताप काढायला ! एक मुलगी मेली; पण दुसरी जिवंत होती ना इथें......' तिनें लगेच माझं अंथरूण-पांघरूण सजवलं. मला गरम गरम चहा आपल्या हातानें पाजला. ती माझ्या शुश्रूषेसाठीं कमर बांधून उभी राहिली. नरसोबाच्या वाडीला मी एका कोंदट अंधाऱ्या खोलींत पडलों होतों. कोणी धर्माचा मायबाप घासभर अन्न पुढें आणून ठेवील का म्हणून दाराकडे डोळे लावून बसत होतों. दिवस-रात्र तो खोलींतला अंधार गिळीत होतों. 'देवा दत्तराजा, सोडव' म्हणून दुःखाचे आवंढे घोटीत होतों.

पण बेळगांवाला आलों अन् मला एकदम हुशारी आली. वाटलं कीं माणसांत येऊन पडलों. आपलीच मुलगी आहे; तेव्हां हक्कानें सांगतां येईल, करून घेतां येईल. पोरीच्या घरीं असं कुजत पडगं बरं नव्हे, असं कधींमधीं वाटे; पण दुबळेपणानें माझा सगळा अभिमान चेंदून टाकला. मरायचं तरी इथें सुखानें मरतां येईल अशी जिवाला लालूच वाटली.

आठ-पंधरा दिवस कसे गेले. तें कळलं नाहीं. आणि मग एक दिवस सिंधू चहा घेऊन आली. माझ्या उशाशीं बसली. तिनें मागचे अनेक विषय काढले. ज्यांनीं माझा अपमान केला आणि मला गृहत्याग करून नरसोबाच्या

वाडीला जायला भाग पाडलं, त्या माझ्या भाऊ–भावजयीला तिनें शेलक्या शब्दांत नादान ठरवलं. अन् तेवढं करून ती मूळ मुद्यावर आली.

"तात्या, माणसाच्या देहाचा काय भरंवसा? त्यांतून तुम्ही आतां पिकलं पान! तेव्हां फोंड्याच्या त्या ढवळीकर व्यापाऱ्याला तुम्ही कर्जाऊ दिलेल्या हजार रुपयांची आतांच काय ती निरवानिरव केलेली बरी, नाहीं का? नाहीं तर मागाहून—"

सिंधूचं खरं स्वरूप प्रगट झालं. तो व्यवहार तिला ठाऊक होता. भावालाहि ठाऊक होता. पण त्यांत मी सपशेल बुडालों हें मात्र कोणालाच ठाऊक नव्हतं. ढवळीकर माझा परम मित्र होता. एक खांड आम्ही दोघे मिळून खात होतों. सहविचारानं वागत होतों. त्याच्या एका प्रसंगाला मी ते हजार रुपये त्याला दिले होते. देतांना दोन अक्षरंसुद्धां त्याच्याकडून लिहून घेतलीं नव्हतीं. मला त्याची गरजहि वाटली नव्हती.

पण तो गृहस्थ एकाएकीं वारला आणि त्याच्या मुलानें त्या व्यवहाराबद्दल सरळ कानावर हात ठेवले. मरण्याजिण्यासाठीं म्हणून तें धन मीं शिल्लक टाकलं होतं. त्याचं असं मृगजळ झालेलं पाहून मला धक्का बसला. मी तळमळलों. कांहीं दिवस खिन्न मनस्थितींत काढले अन् मग एके दिवशीं निश्चय केला कीं, गेलेलं धन परत मिळवायचं. काय वाटेल तें होवो; पण हजार रुपये पुनश्च गांठीला बांधलेच पाहिजेत. मी अधिक काढे शिजवूं लागलों. आधिक चूर्णं कुटूं लागलों. उन्हातान्हांतून आठ-आठ, दहा-दहा मैल रोगी पहायला जाऊं लागलों. वयोमानाला झेपणार नाहीं तें आरंभलं. मला त्या हजार रुपयांचा ध्यास लागला होता. त्यावेगळं दुसरं कांहीं दिसत नव्हतं. हजार रुपयांबरोबरच मला माझा मूर्खपणाहि भरून काढायचा होता. माझी हानि मी कोणालाहि कळूं दिली नव्हती.

चार महिन्यांत मी दोनशें रुपये सांठवले. याच प्रमाणांत पुढचा हिशेब मांडला. पण दैवानं माझ्या एकंदर आयुष्याचाच हिशेब निराळ्या प्रकारें मांडला होता तो मला कसा कळावा! त्या चार महिन्यांत जे कायिक अन् मानसिक कष्ट मी भोगले त्यांनीं माझी प्रकृति एकदम ढांसळली. छातींत कलकल, चार पावलं चाललं कीं भोवळ......कांहीं दिवस तसेच काढले, पण पुढें निभाव लागेना.

अखेर एक दिवस वैतागलों अन् म्हटलं, ' पाड पडो त्या रुपयांचं ! सत्तेचं घर आहे तिथें जाऊन पडावं. बरं वाटलं तर तिथेंच हातून होईल तें करावं. ' सगळं बिऱ्हाड उचललं अन् घर गांठलं. भावाला कळलं कीं मी कायमचा रहायला आलों भावजयीची खात्री झाली कीं, आतां चंदी बंद. दोन्ही ठाव शेर-अच्छेर उकडून मात्र घालावं लागणार. अन् पुढें त्यांनीं कशी वर्तणूक केली असेल तें तुम्ही कल्पनेनं जाणूं शकाल बळवंतराव. एक दिवस तर अपमानाची कड पोंचली अन् त्याच तिरमिरीसरशीं मी घर दूर करून दत्ताचे पाय जवळ केले. "

तात्या आणखी एकदां स्तब्ध झाले आणि एक लांब निःश्वास सोडून पुढें सांगूं लागले

" मी ही हजार रुपयांची कथा सिंधूला सांगितली. तिला म्हटलं, ' पोरी ! तुझा बाप कफल्लक आहे अन् अशा पराधीन अवस्थेंत तुझ्या घरीं येऊन पडला आहे. ' मला वाटलं होतं कीं ती माझं सांत्वन करील. म्हणेल कीं तात्या, तुम्ही झाल्यागेल्याचा शोक करूं नका. तुम्ही कशाहि स्थितींत असलांत तरी आम्हांला जड नाहीं. तुमचा आशीर्वाद आम्हांला हजारांपेक्षां अधिक मोलाचा आहे.

पण तिनं तसं कांहीं म्हटलं नाहीं. ती काळं ठिक्कर तोंड करून फुणफुणदिशीं माझ्यापुढून निघून गेली. माझं सांगणं तिला खरं वाटलं नाहीं. मी ते पैसे भावाच्या डोंबल्यावर घातले अन् तिला नाडलं अशी तिची समजूत झाली होती तेव्हांपासून तिची वागणूक बदलली मला तें बोंचलं. वाटलं कीं, आतां इथें राहूं नये.

पण मी तिथें राहूं नये हें माझ्या आधीं त्यांनींच ठरवलं होतं. दुसऱ्या दिवशीं जांवईबुवा मला म्हणाले, ' तुम्हांला उद्यां मी घरीं पोंचवणार आहे. इथें जागेची अडचण, माणसांची अडचण, सगळीच अडचण. शिवाय तुमचं हें दुखणं किती दिवस रेंगाळेल हें कोणी सांगावं ?...... '

मला एकदम धक्काच बसला. कशाहि परिस्थितींत मला घरीं जायचं नव्हतं. घराचं तोंडसुद्धां पहायचं नव्हतं. घरच्या माणसांना मी केव्हांच मेलों होतों. मी जांवयांना काकुळती आलों. ' मला घरीं नेऊं नका. पुनः

वाडीला नेऊन टाका. तुमच्याकडे नाहीं तर दत्ताच्या पायाशीं मरूं दे मला. घरीं नको. घरीं मुळींच नको... '

पण माझ्या शरिरांत जोम नव्हता आणि म्हणूनच शब्दांतहि नव्हता. माझ्या काकुळतीची कोणी कदर केली नाहीं. त्यांच्या निर्णयाविरुद्ध मी कसलाच प्रतिकार करूं शकत नव्हतों. ओरडण्याचासुद्धां. दुसऱ्या दिवशीं जांवयानें माझं मोटळं उचललं अन् मोटारींत घातलं. तिसऱ्या दिवशीं दुपारीं मी या पडवीवर येऊन पडलों. जांवई आपल्या जबाबदारींतून मोकळा झाला. कफल्लक सासऱ्याची ' पिडा ' त्यानें दूर केली.

इथें आलों तर ही तऱ्हा ! कोणी विचारीत नाहीं मला. भावजय येतां जातां टोसरे घालते ' ही अबर्गत आमच्या उरावर घालून मुलगी मोकळी झाली. हजार रुपये तेवढे तिला गोड वाटले बापाची चाकरी मात्र करायला नको. त्या खस्ता खायच्या आम्ही ! आमच्यामागें फुकटची ब्याद. ' हे तिचे येत्या-जात्याजवळ निघणारे उद्‌गार. तिला वाटतं कीं ते हजार रुपये मी मुलीला दिले अन् मुलीला वाटतं कीं मी ते चुलत्याला खावविले--"

तात्या पुन्हा गहिंवरून स्तब्ध झाले. एकवार नाक, डोळे पुसून त्यांनीं भिंतीला पाठ लावली. त्यांच्या चेहऱ्यावर पहावणार नाहीं इतका भकासपणा पसरला. ' तुका म्हणे तया, दोहींकडे धक्का ' अशी त्यांची दशा झाली होती. त्यांच्या बाबतींत गणगोतानें माणुसकी खुंटीला टांगली होती. ज्या घरासाठीं त्यांनीं जीव आटवला तेंच त्यांच्यावर अंतकाळीं उलटलं होतं. मला दिसत होतं, कीं त्यांचे आतां ' दस गेले नि पांच उरले. ' पण तेच खडतर होते. मला वाटलं, यांचा प्राणपक्षी जेव्हां उडून जाण्यासाठीं पंख फडफडवूं लागेल, तेव्हां यांच्या उशाशीं कोणीहि नसेल. यांच्यासाठीं कोणीहि डोळ्यांतून एक थेंब टाकणार नाहीं. आपला मृत्यु एखाद्या जिवाला तरी अस्वस्थ करीत आहे हें पहाण्याचं भाग्य तात्यांच्या नशिबीं नाहीं. यांचं कलेवर उचलल्यावर हीं माणसं म्हणतील, ' पडवीवरची औट हात जागा अडली होती ती मोकळी झाली. '

मला एकाएकीं कसंसंच झालं. त्यांची ही अशरण अवस्था मला पहावेना. ते या आजारांतून बरे होतील ही आशा नव्हतीच. पण मृत्यु

यायचा तो मात्र थांबत, थबकत येत आहे असं वाटत होतं. मी त्यांना हृदयांतल्या उमाळ्यानं म्हटलं.

" तात्या, माझ्याकडे येतां का? मी तुम्हांला पाठुंगळी बसवून घरीं घेऊन जातों. माझ्या घरीं माझ्याशिवाय तुमच्या नात्याचं कोणी नसेल. पण आहेत तीं ' माणसं ' आहेत एवढंच सांगतों. "

" नको, नको ! मी आहें इथेंच बरा आहे. आतां एकदम आणि एकदांच इथून हालायचं. तुम्ही म्हटलंत एवढ्यांत सगळं पावलं मला. त्या हेतूनें मी तुम्हांला बोलावलंच नव्हतं. एकदां तुम्हांला पहावं एवढीच इच्छा होती ती पूर्ण झाली. तुमच्या मनांत माझ्याविषयीं राग नाहीं हेंहि कळलं. वाडीला असतांना तुमच्या एकाहि पत्राला मीं उत्तर धाडलं नाहीं. विशेष म्हणजे तुम्ही तुमच्या मुलाच्या मुंजीचं पत्र लिहिलंत त्यालाहि मीं उत्तर केलं नाहीं. तुम्ही मनांत म्हणालां असाल ' माझा मुलगा म्हणजे कांहीं तात्यांचा नातू नव्हे. त्याच्या बऱ्या-भल्याची त्यांना काय चिंता ! दोन ओळींच्या आशीर्वादालासुद्धां तो पात्र ठरला नाहीं. '

" पण बळवंतराव ! तसं नव्हतं तें. कोरडा आशीर्वाद धाडायला हात पुढें होईना. ज्या हातानं मी भावाला, मुलीला अन् इतर अडल्यापडल्यांना-सुद्धां पैशांची खिरापत वांटली, तोच माझा हात कोरडा पडला होता. तुम्हांला अहेर म्हणून पाठवायला पांच रुपयेसुद्धां माझ्या गांठीं नव्हते. माझ्या अकिंचन अवस्थेचं त्या दिवशीं मला असह्य दुःख झालं. मी दत्तमहाराजांच्यापुढें जाऊन बसकण घेतली. माझ्या पाठीमागें कृष्णाबाईचा खळाळ वहात होता. अन् माझ्या दोन्ही डोळ्यांतून अश्रू ओघळत होते..."

" जाऊं द्या तात्या ! कशाला हवा तो विषय ? तुम्ही म्हणतां तसं एकदां मला वाटलं, पण मी तें मनांत ठेवलं नाहीं. "

" होय, तें मला कळतं. त्याशिवाय तुम्ही मला आपल्या घरीं न्यायला तयार झालां नसतां. देव तुमचं भलं करो ! पण मला आतां सुखाची इच्छा नाहीं. आयुष्य वाढवण्याची त्याहून नाहीं. आतां एकच दत्तगुरूकडे मागणं ' सट् कीं फट् '— "

" कां ? चला कीं. एवढे प्रेमाचे जांवई नेतों म्हणतात, तर काय हरकत आहे जायला ? तिथें सुखाचं ताट वाढून ठेवलं आहे तुमच्यासाठीं."

हा तात्यांच्या भावजईचा आवाज होता. ती कुडाच्या आडून एकदम पडवीवर प्रगट झाली होती. तात्यांचं बोलणं तिनें आडून ऐकलं असलं पाहिजे. आली तोंच तिनें तोंडाचा तोफखाना सुरू केला.

"...घटकाभर येऊन मायेचा उमाळा कोणीहि दाखवील. चोवीस तास रखडावं लागलं म्हणजे कळेल मग प्रेम.. ..." ती बाई तात्यांना 'जायफाय' बोलली. तिनें तात्यांचे सगळे पितर उद्धरले. मला चहाडया सांगितल्या या कल्पनेनें त्यांची लाज-शरम काढायलाहि तिनें कमी केलं नाहीं. त्यांच्या मस्तकांवर पुष्पांजुळि वहातांना त्यांतलीं कांहीं फुलं माझ्याहि डोक्यावर पडलीं. तात्या निर्वीर्य, हतबल, जर्जर म्हणून तिचा प्रतिकार करूं शकत नव्हते अन् मी परका, दुसऱ्याच्या घरीं आलेला म्हणून. तात्यांच्या भावजईच्या तोंडाला लागण्याची माझी काय प्राज्ञा होती! मी फक्त तिथून निघून जाऊं शकत होतों. आणि तेंच मीं करायचं ठरवलं. मी वस्तीला एक रात्र तात्यांना सोबत करणार होतों. पण आतां तें अशक्य होतं. मी उठलों अन् तात्यांना म्हटलं,

"तात्या, येतों मी."

पण ते मला निरोप देण्याच्या ऐवजीं माझ्या तोंडाकडे बघत राहिले. त्यांचं तोंड रडवेलं झालं होतं. डोळे तुडुंबले होते. जांवई जातो म्हणजे आपला एकमेव आशातंतु तुटतो आहे असंच जणूं त्यांची ती केविलवाणी मुद्रा दर्शवीत होती. त्यांचा उरलासुरला धीर खचला होता. ते मला म्हणाले.

"बळवंतराव, मला न्याल तुमच्या घरीं? मी नुसता पडून राहीन. घालाल तें खाईन. तुम्हांला मुळींच त्रास देणार नाहीं....पण मला या यातनागृहांतून सोडवा. सोडवाल ना?...न्याल ना मला?"

माझं काळीज चरचरलं. आई सोडून जाऊं लागली म्हणजे मूल जसं गयावया करतं तसं, अगदीं तस्सं तात्यांनीं केलं होतं. एक म्हातारा पोराहून पोर होऊन घळघळां रडत होता. हृदयाला घरं पाडणारं अतिकरुण असं दृश्य होतं तें. मी उभा होतों तिथेंच स्तब्ध झालों. एक क्षण माझ्या अंतरांतलीं चक्रं उलटीं-सुलटीं फिरलीं. आणि माझ्या तोंडून शब्द उमटले.

"नेईन तात्या. अवश्य नेईन. ते डोळे पुसा पाहूं आधीं!"



# बालमित्र

एखाद्या खडकावर कमळ उगवलेलें पाहून माणसाला जें आश्चर्य वाटेल तेंच जनार्दनाला त्या गांवांत पाहून मला वाटलें. पण जनार्दनच का तो? का माझे डोळे मला फसवताहेत? शंकाच नको. ते पांगे पाय, ते बारीक पण खोल डोळे, ती खरबरीत कातडी हीं लक्षणें दुसऱ्या कोणाचीं असणार! तो एका उपाहारगृहाच्या दारांत पानपट्टीच्या दुकानापुढें उभा राहून सिगरेट पेटवीत होता. तो पुढें वळणार इतक्यांत मी त्याला हांक मारली. तो थबकून माझ्याकडे पाहूं लागला. बहुधा त्याला माझी ओळख पटली नसावी. पण त्याला फार वेळ घुटमळावें लागलें नाहीं. त्याच्या स्मृतिचक्रानें गरगर फिरून नामरूपांची सांगड घातली.

" वामन, कधीं आलास? " त्यानें मला विचारलें.

" पटली का ओळख? "

" ओळख विसरते होय रे! "

" तें सांगूं नकोस. तूं क्षणभर घोटाळला होतास. निदान या निशाणी-वरून तरी तूं मला पहिल्या झटक्याला ओळखायला हवं होतंस." मी माझ्या डाव्या भुवईत दिसण्यासारखी खोक होती तिच्यावर बोट ठेवून म्हटलं.

तो लाजला अन् नुसताच हसला. लहानपणीं कोंकणांत असतांना वरच्या माळावर विटी दांडू खेळतांना त्याच्याच विटीनें गाजवलेला तो प्रताप होता. घाव भरला होता. पण खूण जन्माला पुरली होती. मी माझा स्वतःचा विमा उतरला त्या वेळीं शरीरावरची निशाणी या सदरांत तीच खोक नोंदवली होती.

" चहा घेतोस का? चल. " तो म्हणाला.

आम्ही दोघे त्या उपाहारगृहांत शिरलों. साखरेच्या दुर्भिक्षाचे ते दिवस होते; पण जनार्दनानें माझ्यासाठीं 'स्पेशल चहा' मागवला. आम्ही दोघे अमोरासमोर बसलों. तो माझ्या गरम सुटाकडे, गळ्यांतल्या टायकडे,

खडयाच्या आंगठीकडे अन् टेबलावर ठेवलेल्या माझ्या काळ्या तुकतुकीत पोर्टमॅन्टोकडे कुतूहलानें पाहूं लागला. अखेर त्याला रहावलें नाहीं.

" एकदम साहेब बनलास कीं रे ! " त्यानें म्हटलें.

" बाबा रे, धंद्याची प्रतिष्ठा राखायची म्हणजे पोषाखाच्या बाबतींत अप-टु-डेट रहावं लागतं."

" कसला धंदा करतोस ? "

" विम्याचा. एका प्रसिद्ध विमाकंपनीचा एजंट आहें मी. गिऱ्हाइकं गटवून कंपनीला नेऊन द्यायचीं अन् कमिशन मिळेल तें खिशांत टाकायचं हें माझं काम. आजवर दीड लाखाचं काम झालं आहे—"

" दीड लाख ? " जनार्दनानें ' आ ' उघडून अन् डोळे ताणून विचारलें.

" एवढं आश्चर्य काय वाटलं तुला ? मी नेहमींच गबर कुळं गांठतों. पांच, निदान दोन हजारांच्या खालीं प्रपोझलच भरीत नाहीं. इथेंसुद्धां त्याच कामासाठीं आलों आहें. इथला शेंदुर्णीकर जहागिरदार ठाऊक आहे तुला ? अन् तो पित्रे सावकार—"

" आहे ठाऊक. " असें म्हणून जनार्दन चहाचे पैसे देण्यासाठीं उठला. आम्ही दोघे तिथून बाहेर पडलों. माझ्याबरोबर तोहि चालूं लागला. त्याचे पांगे पाय सुधारणें शक्यच नव्हतें. पण चालतांना अधूनमधून ' कट्ट ' वाजणारें त्याच्या गुडघ्याचें हाड अजूनहि तसाच आवाज काढीत होतें. हातवारे करून बोलण्याची त्याची संवयहि कायमच होती. त्याला पाहून वीस वर्षांपूर्वींचें आमचें किशोरवय माझ्या मनांत जागृत झालें. माळावर गुरें वळवून आणायला, रानांत तोरणें अन् जांभळें खायला, गांवोगांवच्या काले-जत्रा पहायला, आम्ही असेच जोडीनें हातांत हात घालून जात होतों. आमच्या मैत्रीचा रस गळत होता. आम्ही काय हितगुजें करीत होतों, तें आतां आठवत नाहीं. पण आमचें बोलणें मात्र कधींच संपत नव्हतें. आणि तोच लहानपणचा पांग्या जनार्दन पुऱ्या पंधरा वर्षांनंतर मला भेटला होता. मीं त्याला म्हटलें.

" एवढा वेळ मीच सगळं बोललों. आतां तुझं वर्तमान सांग ना ! तूं काय करतोस इथें ? "

" मी राजवाड्यांत खासगीकडे नोकरी करतों. "

तें गांव कुठल्याशा संस्थानाची धाकटी पाती आहे. तिथें सरकारवाडा आहे, अर्थात् त्यांत सरकारहि असणारच; हें सगळें मला मान्य होतें. पण ज्यानें श्री सुद्धां कधीं गिरवली नाहीं, अशा या अक्षरशत्रु जनार्दनाला खासगीकडे नोकरी मिळाली आहे हें मात्र मला खरें वाटेना. पण माझी समजूत चुकली होती. मी समजत होतों कीं, तो कारकून आहे. बऱ्याचशा बोलण्यावरून मग कळलें कीं, तो वाड्यांत शागीर्द आहे. आणि दुसरेंहि कळलें तें हें कीं, त्याला आपल्या पेशाबद्दल अभिमानहि आहे. राम्या शागिर्दाचा रामशास्त्री प्रभुणे होणें हा लाखांतला एखादाच अद्भुत अपवाद. बाकीच्या सगळ्यांना तेंच गोड मानून रहावें लागतें. जनार्दन खुषींत येऊन मला सांगत होता.

" ...महाराजांचं माझ्याशिवाय पान हलत नाहीं. जिथें तिथें जनू हवा. हातावर पाणी घालायला जनू, जेवायला बसले कीं, माशा वारायला जनू. ताट-वाट्यासुद्धां जनूनेंच स्वच्छ पुसून मांडायला हव्यात. पानांतला कोणता पदार्थ संपला आहे याकडेहि जनूनेंच लक्ष पुरवायला हवं. नाहीं तर लगेच ' जन्या गाढवा ' अशी पुष्पांजाळि मिळायची. बाकनीस, आचारी, वाढपी म्हणतात कीं, महाराजांचा जनार्दन लाडका आहे. डोळ्यांवर येतं त्यांच्या. त्यांचं तसंच प्रेम आहे माझ्यावर. मात्र कल पाहून वागायला हवं बरं कां ! ' जन्या ऽऽ ! ' अशी ओरडून हाक आली कीं, पुढें जातांना मान खालीं घालून जायचं. ' जनोबा ' अशी खुषीची हांक आली कीं, ओठांतल्या ओठांत हंसत पुढें उभं रहायचं. महाराज कित्येकदां आईबाप उद्धारतात; पण तें मनावर घ्यायचं नाहीं. बोलेल तोच जवळ करील नाहीं का ? "

" आतां हेंच पहा. हा माझ्या अंगांतला रेशमी शर्ट, हा गरम कोट. खुद्द महाराजांच्या अंगांतले आहेत हे कपडे. कंटाळा आला म्हणजे फेकतात माझ्या अंगावर. म्हणतात कीं, ' जन्या लेका, रुबाब कर.' युवराजांचा वाढदिवस झाला कीं धोतरं मिळतात. वर्षाची ददात मिटते कपड्यांची. वर्षाला एकदां रजा घेऊन कोंकणांत जातों मी. येतांना चार शहाळीं, फणसाची साटं, आटवलेला आंबरस, शेरभर काजुगर असं

कांहीं तरी आणतों अन् पुढें ठेवून साष्टांग नमस्कार घालतों. मग महाराज राणीसरकारांच्याकडे पाहून हसत हसत म्हणतात.

" जन्या लेकाचा वस्ताद आहे बरं का ! आवळा देऊन कोहळा कसा काढावा तें चांगलं समजतं गुलामाला. "

मला जनार्दनाचें हें महाराजपुराण विशेषसें रुचलें नाहीं. त्यांत महाराजांच्या मोठेपणापेक्षां जनार्दनाची लाचारीच अधिक कळली मला. मीं त्याला म्हटलें

" तें राहूं दे रे ? तूं लग्न केलं आहेस का नाहीं ? "

" केलं आहे तर ! महाराजांनींच सोयरीक जुळवली. मुलीचा बाप त्यांचाच कोणी तरी जुना आश्रित होता. मला वाटलं, पेन्शनेबल नोकरी आहे आपली; तेव्हां हुंडाबिंडा घ्यायला हरकत नाहीं. पण महाराज म्हणाले, ' जन्या, हुंडा घ्यायचा नाहीं बरं का ! ' मीं म्हटलं, ' आज्ञा. ' महाराजांनीं लग्नाला यायचं कबूल केलं होतं; पण त्यांना आयत्या वेळीं थोरल्या पातीकडून तार आली, त्यामुळें जावं लागलं. पण सरकारस्वारीचा अहेर घेऊन खासगी कारभारी हजर होता. मी लग्न झाल्यावर जोडप्यानें पायां पडायला गेलों, तेव्हां हळूच राणीसाहेबांना म्हटलं.

" आतां हिला पण घ्या ठेवून आपल्या सेवेला. ताईसाहेब महाराजांना चांगलं खेळवील ही. "

माझा शब्द काय फुकट जातो ? चिकटली दुसऱ्या दिवसापासून तिथें. दोघांचंहि जेवणखाण, सगळं वाड्यांतच. मुलाला दूधसुद्धां तिथेंच पाजायचं आपल्या हातानें. घरांत काडीचा खर्च नाहीं. पगार येईल तो पोस्टांत. चिरीमिरी मिळेल ती विडीकाडीला. उगीच का घर घेतलं इथें ! "

आतां आश्चर्याची पाळी माझी होती. मीं म्हटलें.

" जनार्दन, तूं खरंच घर घेतलं आहेस ? "

" घर म्हणजे तसं मोठंसं नाहीं रे. आहे आपली एक छोटीशी मठी. पण सत्तेची आहे. कोणी ऊठ म्हणायला नको. तूं एकदां ये ना ! फार लांब नाहीं. जेलच्या पाठीमागची गल्ली. "

मीं त्याच्या पाठीवर थाप मारून म्हटलं.

" शाबास रे बहाद्दर! शागिर्दी पेशांत राहून तूं एवढं केलंस म्हणजे धन्य आहे तुझी!"

" पण पंधरा वर्षांची सगळी पुंजी त्यांत घालावी लागली. आहेस कुठें? बरें पण, मी आतां जातों. उशीर झाला तर महाराज लक्षपूजा वहायचे. 'जन्या ऽ! कुठें गेला होतास एवढा वेळ भीक मागायला! चाकरी करतोस का मस्करी!'"

जनार्दन चौकांतून डाव्या हाताला वळला. त्याचें गुडघ्यांतलें हाड पुन्हां एकदां 'कट्ट' वाजलें. मीं त्याच्या पांग्या चालीकडे थोडा वेळ पाहिलें. मी पदवीधर होतों. तो निरक्षर होता. मी रुबाब करीत होतों. तो मलिन, गबाळ्या होता. पण एकापरी माझ्यापेक्षां तो सुखी नव्हता काय? मान-अपमान यांतून तो मुक्त झाला होता म्हणजे त्याच्या सुखाला कुठेंच चीर नव्हती. पै, पैसा सांठवून पंधरा वर्षांत त्यानें स्वतःचें घर केलें होतें. मी लाखांच्या भाषा बोलतों; पण मला अजून वीतभर जमिनीचा तुकडाहि घेतां आला नाहीं. खरोखर जनार्दन हेवा करण्याजोगा आहे.

मग मी माझ्या कामाला लागलों. दोन दिवस त्या गांवांत राहिलों. पित्रे सावकार मला बधला नव्हता. पण शेंदुर्णीकर जहागिरदारांचा तीन हजारांचा विमा मी उतरवूं शकलों. माझी पुण्याला जाणारी गाडी रात्रीं होती आणि तोंवरचा वेळ मोकळा होता. वाटलें कीं जनार्दनाकडे जाऊन त्याचें घर पाहून यावें. त्याला एका हजाराची विम्याची पॉलिसी घ्यायला लावावी. तुरुंगामागच्या गल्लींत शिरून चौकशी करीत करीत मी एका घरापुढें जाऊन उभा राहिलों. दांतवण लावून दंतपंक्ति काळीकुट्ट केलेली एक बाई मला पाहून दाराआड झाली. मीं मनांत म्हटलें, ही कांहीं जनूची बायको खास नव्हे.

" जनार्दन इथेंच रहातो ना?" मीं तिला विचारलें.

" कोण जनार्दन?"

" तो सरकारवाड्यांतला शागीर्द."

" जन्या व्हय? त्या बाजूनें मागें जावा."

मी त्या जुनाट दुपाखी घराच्या वळचणींतून मागच्या अंगाला निघालों.

त्या बाजूला मोठें आवार होतें. त्यांत तीन-चार आंब्याचीं झाडें अन् दोन चिंचा होत्या. गांवाची शेवटचीच गल्ली होती ती. तिथें मुंडासेवाला एक बाप्या विहिरीच्या रहाटाशीं कांहीं तरी करीत होता. मी त्यालाहि विचारलें.

" जन्या कुठें रहातो इथें ? "

" तो नव्हं का पळाला तुमास्नी पगून. "

मीं समोर पाहिलें. जन्या आवाराच्या कुंपणांत आंग घुसवून पलीकडे पसार होत होता. मला त्याचें आश्चर्य वाटलें. ' जनार्दन ' म्हणून मी त्याला मोठ्यांदा हाक मारली. त्यानें ' ओ ' तर दिली नाहींच; पण मागें वळूनहि पाहिलें नाहीं. ' तो कशाला थांबतोय् ' तो मुंडासेवाला बुवा मला म्हणाला.

" हें घर त्याचंच ना ? " मीं विचारलें.

" त्याच्या बाप्पाशीचं. हें माजं घर हाय. " तो तुसऱ्या शब्दांत उत्तरला.

" मग तो रहातो कुठें ? "

" त्या कोपऱ्यांतल्या खोलींत. मेल्यानें तीन म्हैन्यांचं भाडंबी दिलं न्हाई. "

मी चार पावलें पुढें होऊन त्या अर्धवट उघड्या खोलींत डोकावलों. महिन्याभरांत तिथें केरसुणी फिरलेली नसावी. त्या केरांतच एक रकटें बसायला टाकलेलें. शेजारींच एक घोंगडीची वळकटी. सभोंवतीं विड्यांचीं थोटकें पसरलेलीं. कोपऱ्यांत एक चूल. तिच्यापुढें राखेचा ढीग. तिथेंच दोन-तीन ॲल्युमिनिअमचीं जळकट भांडीं. मीं म्हटलें, ' वारे घर ! इथें म्हैससुद्धां बसायला तयार व्हायची नाहीं अन् आमचा बालमित्र जनार्दन इथें रहातो !.' जन्याच्या घराचा फुगा फुटला. आतां त्याच्या बायकोची चौकशी करायची. लटक्याला घरपर्यंत पोंचवायचें. मी परत विहिरीकडे येऊन त्या बुवाला पुसलें.

" काय हो, जन्याला बायको आहे ना ? "

" हाय कीं ! "

" मग ती कुठें दिसत नाहीं ? "

" घरांत असली तर दिसायची ना ? "

" म्हणजे ? "

" ती कवांच गेली त्याला सोडून. "

" बायको सोडून गेली ? "

" मग काय करावं त्या पोरीनें ! हा बाप्या दोन वक्तां गोळाभर आन्बी घालीना तिला. तें प्वारबी वाळून कोळ झालं. ती भुकेला रडायची अन् हा वर बदाबदा मारायचा तिला. किती सोशील माणूस ! गेली जालं एक दिस पोराला खाकोटीस मारून ! "

" पण जन्या तर सांगत होता कीं, तिला वाड्यांत नोकरी आहे. "

" त्येचं काय खरं धरताय् तुम्ही ! पोरगी लइ गुणाची पगा. न्हायची, धुवायची, निर्मळ रहायची. पर गाढवाला गुळाची चव काय ? वाड्यांत काम करतो, हूं म्हणून खातो अन् हत येऊन आरागत पडतो. बायको पळून गेली, पोर नजरेआड झालं, त्येचं या मुर्दाडाला हाय का सुकदुक ? "

आणखी काय ऐकायला हवें होतें ? माझा सगळा भ्रम फिटला होता. मी माघारा वळलों. मला जन्याचा भयंकर संताप आला होता. तो माझ्याशीं धादान्त खोटें बोलला होता. खरें म्हणजे त्यानें मला बनवलें होतें. कां नाहीं त्याचा राग येऊं ! 'ठक, सोदा कुठला !' माझे ओठ पुटपुटत होते.

दहा अंक मोजले कीं राग निघतो असें म्हणतात. मग मध्यंतरीं तीन तास गेल्यावर रात्रीं पुण्याच्या गाडींत झोपेची आराधना करीत असतांना तो मावळावा यांत नवल कसलें ! जन्या खोटें बोलला हें खरें; पण कां बोलला याचा कुठें मीं विचार केला होता ! खोटें बोलणें हा कांहीं माणसाचा जातिस्वभाव नव्हे. भयासाठीं, स्वार्थासाठीं किंवा आपलें व्यंग लपविण्यासाठीं ज्याला त्याला खोटें बोलावेंसें वाटतें. अब्रूसाठीं खोटें, प्रतिष्ठेसाठीं खोटें, ही दुसरी तऱ्हा. परिस्थिति माणसाच्या हातीं नसते. दैव त्याच्या इच्छेनुरूप वागत नसतें आणि या प्रतिकूल दैवानें आणून दिलेले भोग उघडे पडूं नयेत म्हणून तो त्याच्यावर असत्याचें पांघरूण घालूं लागतो. तें पांघरूण जाळीदार असतें हें त्यालाहि कळतें. घरांत आंबील

जेवून बाहेर पडतांना मिशीला तूप लावून येणारे लोक या जन्याच्याच वर्गातले नाहींत का ?

जनार्दन माझा बालमित्र. लहानपण गळ्यांत गळा घालून आम्ही काढलेलें. पंधरा वर्षांनंतर आमची गांठ पडली. माझा रुबाब त्यानें पाहिला. माझ्या तोंडांतले लाखांचे आंकडे ऐकले. त्यानें माझ्याशीं आपली तुलना केली असेल. आपली वस्तुस्थिति उघड करणें म्हणजे माझ्यापुढें शरणागति पत्करणें असें त्याला वाटलें असेल. ' अरेरे ! जन्या, काय ही तुझी दुर्दशा ! ' असें म्हणून मी त्याची कींवच केली असती ना ? त्याला तें काय म्हणून बरें वाटावें ! त्याला कांहीं माझ्याकडे दोन चव्वल मागायचे नव्हते. मीहि कांहीं अगदींच सामान्य माणूस नव्हे, असें मला भासवून तो चालता झाला होता.

मी कशाला जावें त्याचें घर शोधीत ? मला त्याचें घर पहायचें होतें का ? मुळींच नाहीं. घर पहायला आलों असें सांगून मी त्याच्याकडे विम्याची भाषा काढणार होतों. म्हणजे मीहि खोटेंच बोलणार नव्हतों का ? आणि मी नित्याच्या व्यवसायांत तरी काय करतों ? कुळांच्या घरीं जाऊन त्यांच्या वृद्धापकाळाची चिंता दाखवायची आणि त्याला प्रपोझलवर सही करायला सांगून स्वतःचा स्वार्थ साधायचा. याला खोट्याशिवाय दुसरें कोणतें नांव देतां येईल ? जनूपेक्षांहि मी या बाबतींत निढावलों आहें. जनूला अजून खोट्याची लाज आहे. म्हणजे अजून त्याचें मन जाणिवेला पारखें झालें नाहीं. तसें नसतें तर मला पहातांच तो पसार झाला नसता. खरें म्हटलें तर जनार्दनापेक्षां त्याच्यावर रागावणारा मीच अधिक ढोंगी आहें. तो जर सकृद्दर्शनीं मला आपली खरी परिस्थिति सांगता, तर मी त्याला माझ्या खांद्याला खांदा लावून सात पावलें तरी चालूं दिलें असतें काय ?

आणि हा प्रश्न जेव्हां मीं स्वतःला विचारला, तेव्हां मला वाटलें कीं, माझ्या मीच थोबाडींत मारून घेतों आहें.

